# शोषण-मुक्ति व नवसमाज

— लेखक —

अप्पा पटवर्धन

किंमत ७५ नये पैसे

पहिली आवृत्ति – डिसेंबर १९५८.

# विनोबांचा आशीर्वाद

अप्पासाहेबांनीं हे पुस्तक ग्रामदानप्रवेशिका म्हणून लिहिले आहे पण लिहिण्याचा आव असा धरला आहे की ज्यामुळें सर्वोदयाच्या अर्थशास्त्राचा तो एक ल्हानसा प्रवचच झाला आहे

एकेक गाव अपूर्ण आणि सर्व गावे मिळून पूर्ण अशी सर्वोदयाच्या अर्थशास्त्राची कल्पना नसते. एकेक गाव पूर्ण आणि सर्व गावे मिळून परिपूर्ण ही सर्वोदयाची कल्पना आहे बापाच्या ताटात पूर्ण लाडू आणि लहान मुलाच्या ताटात अर्धा लाडू हें लहान मुलगा मान्य करू शकत नाहीं. पण बापाच्या ताटात मोठा लाडू आणि लहान मुलाच्या ताटात लहान लाडू हे मुलगा समजू शकतो आणि मान्य करतो. मोठी मूर्ति आणि लहान मूर्ति हा भेद भक्ताला बोचत नाही उलट कधी कधी तो मोठ्या मूर्तीपेक्षा लहान मूर्ति पसतहि करील. पण मोठी मूर्ति आणि तिचा एक तुकडा हा भेद उपासनेच्या शास्त्राला कधीच कबूल होणार नाहीं. एकच पुस्तक मोठ्या टाइपातले आणि लहान टाइपातले हा भेद अभेदाच्या पोटात जिरतो आणि आपल्या डोळ्याच्या मगदुराप्रमाणे त्यातले कोणते पत्करायचे ते वाचक पत्करू शकतो.

बारीक टाइपाचे पुस्तक चालेल हे खरे, पण डोळ्याच्या आजच्या स्थितीत बारीकपणाचीहि काही मर्यादा राहील. तसे लहान गाव पूर्ण आणि सबंध विश्व परिपूर्ण हें मान्य करूनहि आजच्या वैज्ञानिक युगात गावाच्या लहान आकारालाहि काही मर्यादा येईलच. लहान गाव जर पूर्ण हवे तर वैज्ञानिक युगाच्या गरजेनुसार पूर्ण होण्याइतपत त्याचा आकार राहील हें उघडच आहे म्हणजे अति लहान गाव चालणार नाहीं. वेगळ्या भाषेत, गावे जर अति लहान असतील तर दोन चार गावे एक करून एक ग्राम झाला असे मानावे लागेल. ग्रामदानाच्या आरंभाच्या काळात जरी गावाची एक लहान वाडी सुद्धा आपण ग्रामदान

म्हणून स्वीकारतो (आणि तें योग्यच आहे, अन्यथा ग्रामदानाचा उगमच कुंठित होईल) तरी स्वयंपूर्ण ग्रामस्वराज्याची उभारणा करताना गावाचा आकार त्या बेताचा धरावा लागेल.

शिवाय चिनी तत्वज्ञ लाओत्सेची स्वयपूर्ण गावाची कल्पना आजच्या युगात चालणार नाहीं. त्याच्या आदर्श गावाची कल्पना अशी कीं त्या गांवाचे लोक गाव सोडून कधी बाहेर गेलेच नाहींत, म्हणजे त्यांना तसा प्रसगच आला नाही. पण शेजारी दुसरेंहि असेच गाव आहे असे मात्र त्या लोकाना अनुमान होत असे ; कारण रात्रीच्या वेळीं शेजारच्या गावातील कुत्र्याचा भुकण्याचा आवाज या गावात ऐकू येत असे, त्यावरून अनुमान करावे लागत असे की शेजारीं गाव असेल. ही कल्पना आज आपल्याला मानवणार नाही. म्हणजे गावाच्या स्वयपूर्णते-साठी गावाचा आकार त्या बेताचा धरला तरी दुसऱ्या गावाशी – आणि दुसऱ्या गावाशीच नव्हे तर सबध राष्ट्राशी आणि अन्य राष्ट्राशीहि-गांवाचा सबध कल्पावा लागेल. अशी सर्व कल्पना केली म्हणजे ग्रामदान-प्रवेशिका म्हटली तरी तिला व्यापक अर्थशास्त्रीय निबधाचे स्वरूप अपरिहार्य आहे. पण अप्पासाहेबांची ही ग्रामदान – प्रवेशिका उपरिनिर्दिष्ट अर्थानें व्यापक नाही तो मूलभूत मुद्याची चर्चा करणारी असल्यामुळें व्यापक झाली आहे तिची लाबी व्यापक नाही, तिची रुंदी व्यापक आहे.

व्यापक अर्थशास्त्र रुंदीला तसे लाबीलाहि व्यापक असावे लागतें. पण तेवढ्यानेंहि भागत नाही त्याला खोलीहि पर्याप्त लागते अर्थशास्त्राची खोली परमार्थात प्रवेश करते. म्हणजे आध्यात्मिक मूल्याची त्यात शहानिशा करावी लागते. या पुस्तकात अप्पानीं खोली वगळलीच आहे, म्हणजे ती गृहीत धरली आहे.

सारांश खोली टाळून, लाबी गाळून ग्रामदानी गावाच्या अर्थशास्त्राची रुंद व्यावहारिक चर्चा यात केली आहे. आणि अप्पांच्या नेहमीच्या अध्यापक पद्धतीने विद्यार्थ्यांना समजावून सागण्यासारखें विवेचन केलें आहे

मी या पुस्तकाला प्रस्तावना लिहायला अप्पाच्या मुर्वतीसाठी प्रवृत्त झालेला नाही पण सबंध रत्नागिरी जिल्हा – मला त्या जिल्ह्याचे जें थोडेंसें दर्शन झाले त्यावरून – ग्रामदानी जिल्हा होऊ शकतो, आणि त्याची प्रेरणा लोकाना देण्यासाठी या पुस्तकाचा काही उपयोग होईल, अशा आशेने प्रवृत्त झालो आहे इतके लांब लिहिण्याची माझी कल्पना नव्हती, पण नद्याच्या पुराने अडवणूक केल्यामुळें आज पहाटेचा निवात वेळ पदरी पडला, त्यामुळें प्रस्तावना अशी आकाराला आली.

जय जगत्, जय ग्रामदान

प्रकाशी ( पश्चिम खानदेश )
२ सप्टेंबर १९५८

विनोबा.

---

आजच्या समाजात एक अजब न्यायाचा मासला दिसतो. क्षुल्लक चोऱ्या करणाराना चोर म्हटले जाते. आणि मोठ्या चोऱ्या करणाराना – संग्रह करणाराना – मान दिला जातो. जेथें किल्ल्या – कुलुपें वाढतात तेथेंच चोऱ्याहि वाढतात.

समाजात चोऱ्या होऊ नयेत अशी जर आपली इच्छा असेल तर समाजाची शुद्धि होणे आवश्यक आहे त्यासाठी जमिनीचे वाटप केले पाहिजे व सर्वांना काम मिळवून दिले पाहिजे. ग्रामोद्योगावाचून सर्वांना काम देणे अशक्य आहे.

जो थोडें काम करून ज्यास्त पैसा घेतो, तसेच जो काहीहि श्रम न करता एखाद्याच्या घरून हजार रुपये घेऊन जातो त्याला मी चोर म्हणतो तेव्हा न्यायाधीश आणि प्रोफेसर इत्यादि लोकहि चोर समजले जातील. कारण ते ज्यास्तीत ज्यास्त ३ – ४ तास काम करतात व पगार मात्र पुष्कळच ज्यास्त घेतात

आपला घाम गाळून पोट भरणारे मजूर व शेतकरी सोडले तर आपल्या सर्वांची गणना लुटारूमध्येंच होते. हे आम्ही नीट समजून घेतले पाहिजे.

– विनोबा.

# शोषणमुक्ति व नवसमाज

## — अनुक्रमणिका —

## IV परिशिष्ट



## V माननीय श्री. रा. कृ. पाटील यांचा समारोप



## VI लेखकाचें निवेदन

# शोषणमुक्ति व नवसमाज

## I हेतु

### १ सज्जनाचा दुराचार

मनुष्य मुळात सत्प्रवृत्त आहे, मागल्याचा भोवता आहे ससारयात्रे- मध्ये ( यात्रा म्हणजे प्रवास ) अडचणीच्या प्रसगात सापडला असता सज्जन मनुष्यसुद्धा भलभलती कृत्यें करण्यास उद्युक्त होतो पुढें या अपप्रवृत्तीची काहीना सवयच पडून जाते व अडचणीचे प्रसग नसताना- सुद्धा ते दुष्कृत्यें करताना आढळतात मूळचे निर्मळ चकाकित धातूचे भाडें जसे वापराने विटते व काळवडते तसाच मूळचा निष्पाप स्वभावाचा मनुष्यहि दुष्ट बनतो परतु भाडयाची चकाकी परत व्यक्त करण्यासाठी जसे विशेष सायास पडत नाहीत तसाच मनुष्याचा अभिजात चागुलपणाहि योग्य शिक्षणानें व रचनेने उजळणे शक्य आहे सत विनोबा आज हेच कार्य करीत आहेत

विनोबा भूदान, ग्रामदान यासारखे कार्यक्रम अभेदाच्या उच्च भूमिकेवरून माडीत असतात भेदाच्या भूमिकेवर वावरणाऱ्या सामान्य जनाना त्याचा उपदेश आदरणीय वाटतो पण व्यवहार्य वाटत नाही विनोबा जें आध्यात्मिक भूमिकेवरून सागतात ते सर्वस्वी नसले तरी बऱ्याच अशानें सामान्य व्यवहाराच्या भूमिकेवरूनहि कसे अपरिहार्य व हितकर आहे ते लोकाना समजावून देण्याची आवश्यकता आहे या पुस्तिकेच्या द्वारा माझा तोच प्रयत्न आहे

अहिंसक समाज-रचनेचे ध्येय कोणाला प्रिय नाही? अहिंसक नसेल तर तो समाजच नव्हे, तो केवळ घोळका म्हणावा लागेल शुद्ध व्यवहाराचे यथायोग्य नियम योजून ते कसोटीने अमलात आणल्यास

माणसाची अन्यायाकडील प्रवृत्ति नष्ट होऊ शकेल व अहिंसक समाज – रचना सिद्ध होईल. मुंबईचे रहिवाशी गर्दीच्या प्रसंगी चेंगराचेंगरी न करता सरळ रांगेत (क्यूमध्यें) उभे रहातात त्यामुळें त्यांची हालचाल किती सुखाची व सभ्यपणाची होते त्याचा प्रत्यय सर्वांना आलेला आहे. क्यू हा मुंबईकराचा जणू स्वभावच बनून गेला आहे बाहेरून आलेला नवखा मनुष्यसुद्धा मुंबईत आपसूख रांगेत उभा रहातो. तोच इतरत्र चेंगराचेंगरीहि करतो. असे कां होते ? तर क्यूचा संकेत सुखाचा आहे हे त्याला पटलेलें असलें तरी लोक तो पाळतील असा त्याला इतरत्र भरवसा वाटत नाही. म्हणजेच योग्य रीतीचे ज्ञान आणि लोकेंहि ती रीत पाळतील असा विश्वास एवढीं दोन मिळाली म्हणजे अहिंसक समाजरचना होऊ शकेल. क्यूची सवय हा अहिंसक समाजरचनेचाच दाखला आहे

समजा की एक गलबत बुडण्याच्या पथाला लागले आहे त्यांतील उतारूना वाचविण्यासाठीं एक होडी आली. त्या होडींत सर्वांनीच घुसून उड्या मारल्या तर फाजील वजनाने ती होडी त्या गलबताच्या आधीच बुडून जाईल. पण जर उतारू शिस्तीने व बेताबेताच्या संख्येने उतरत गेले तर ती होडी पुन्हा पुन्हा खेपा करून सर्व उतारूना वाचवू शकेल शिस्त म्हणजे योग्य संकेतांचें पालन.

मात्र या पुस्तिकेमध्यें आपल्याला सर्वोदयाच्या आर्थिक संकेतांचाच विचार करावयाचा आहे. सर्वोदयाच्या दृष्टीने सामाजिक संकेतांनासुद्धां फार महत्व आहे: उदा. मानवी समतेचा स्वीकार व पालन आवश्यक आहे. परंतु त्याचा उहापोह सध्या आपल्याला कर्तव्य नाहीं. हल्लीच्या अर्थप्रधान युगात आर्थिक संकेताना विशेषच महत्व प्राप्त झाले आहे, व त्याबाबतींत मला सुचलेले व महत्वाचे वाटणारे काही विचार मला सुज्ञ वाचकांच्या विचारार्थ येथें मांडावयाचे आहेत.

## २ निर्बंध व अनुनय

समाजसंघटनेच्याबाबतींत काही गोष्टी निर्बंधानी साधाव्या व काहीं अनुनयाने म्हणजे उपदेश, विनति, मनवळवणी, उत्तेजन, लोकशिक्षण इत्यादीनी, परंतु आचरण कर्त्याच्या मर्जीवर सोडून. परीक्षाच्या अभ्यासक्रमामध्यें जसे काही विषय आवश्यक व काही ऐच्छिक असतात त्याचप्रमाणें समाजस्वास्थ्यासाठीसुद्धा काहीं गोष्टीबाबत निर्बंध घालण्यात यावे व काही गोष्टी स्वेच्छेने घडवून आणण्याचा प्रयत्न व्हावा, आवश्यक व ऐच्छिक, किमान व फालतू, अकरणात्मक व करणात्मक, कर्तव्यपूर्ति व उपकार अशासारखा हा फरक आहे प्रत्येक खरी गोष्ट सोबत्याना सागण्याचा माझेवर निर्बंध असू शकत नाही, पण सागेन तें खोटें असता नये असा मात्र निर्बंध आहे. मी वाटमारी करता कामा नये हा निर्बंध, वाटसरूची सेवा मी किती कशी करावी किंवा करू नये तो माझ्या मर्जीचा प्रश्न आहे

विनोबाजीनी देशापुढें व जगापुढें माडलेल्या थोर विचारांमध्यें अशा काही गोष्टी समाविष्ट आहेत कीं त्या निर्बंधाचा विषय होऊ शकतात. दुसऱ्याच्या श्रमाचा अपहार करू नये हा निर्बंध. श्रमदान करणे हा अनुनयाचा विषय आहे. भूमीवर कोणाची अबाधित मालकी असता नये असा निर्बंध असावा मी पिकवलेले धान्य मी अन्य गरजवतानाहि द्यावे हा अनुनय होय पिळणूक न करणे हा निर्बंध, अपरिग्रह हा अनुनय. निर्बंध ही पायाभरणी ; अनुनय ही त्याच्या वरील उभारणी. अनुनय हाच श्रेष्ठ व परिणामकारक मार्ग आहे. कारण निर्बंधसुद्धा कर्त्यांच्या संमतिविना केवळ बाह्य दडपणाने पूर्ण यशस्वी होत नसतो स्वयप्रेरणेमध्येंच खरी शोभा व शक्ति आहे, आणि ही स्वयप्रेरणा समजुतीनें, शिक्षणाने व आचरणानेंच साधेल. तथापि मनुष्य समाजनिष्ठ, म्हणजे समाजामध्यें ओतप्रोत मिसळलेला, असल्यानें त्याच्या प्रेरणामध्यें स्वयप्रेरणा व परप्रेरणा असा आत्यंतिक फरक रहात नाही बहुतांची जी स्वयप्रेरणा तो एकेकटयावरील निर्बंध बनतो. माझी

माणसाची अन्यायाकडील प्रवृत्ति नष्ट होऊ शकेल व अहिंसक समाज - रचना सिद्ध होईल. मुंबईचे रहिवाशी गर्दीच्या प्रसंगी चेंगराचेंगरी न करता सरळ रांगेत (क्यूमध्ये) उभे रहातात त्यामुळें त्यांची हालचाल किती सुखाची व सभ्यपणाची होते त्याचा प्रत्यय सर्वांना आलेला आहे. क्यू हा मुंबईकराचा जणू स्वभावच बनून गेला आहे. बाहेरून आलेला बवखा मनुष्यसुद्धा मुंबईत आपसूख रांगेत उभा रहातो. तोच इतरत्र चेंगराचेंगरीहि करतो. असे कां होतें ? तर क्यूचा संकेत सुखाचा आहे हे त्याला पटलेलें असलें तरी लोक तो पाळतील असा त्याला इतरत्र भरवसा वाटत नाही. म्हणजेच योग्य रीतीचें ज्ञान आणि लोकहि ती रीत पाळतील असा विश्वास एवढीं दोन मिळालीं म्हणजे अहिंसक समाजरचना होऊ शकेल. क्यूची सवय हा अहिंसक समाजरचनेचाच दाखला आहे

समजा की एक गलबत बुडण्याच्या पंथाला लागले आहे त्यांतील उतारूना वाचविण्यासाठी एक होडी आली. त्या होडीत सर्वांनीच घुसून उड्या मारल्या तर फाजील वजनाने ती होडी त्या गलबताच्या आधीच बुडून जाईल पण जर उतारू शिस्तीने व बेतावेताच्या संख्येने उतरत गेले तर ती होडी पुन्हा पुन्हा खेपा करून सर्व उतारूना वाचवू शकेल शिस्त म्हणजे योग्य संकेताचें पालन

मात्र या पुस्तिकेमध्यें आपल्याला सर्वोदयाच्या आर्थिक संकेतांचाच विचार करावयाचा आहे. सर्वोदयाच्या दृष्टीने सामाजिक संकेतांनासुद्धा फार महत्त्व आहे उदा. मानवी समतेचा स्वीकार व पालन आवश्यक आहे. परंतु त्याचा उहापोह सध्या आपल्याला कर्तव्य नाहीं. हल्लींच्या अर्थप्रधान युगात आर्थिक संकेतांना विशेषच महत्त्व प्राप्त झाले आहे, व त्याबाबतींत मला सुचलेले व महत्त्वाचे वाटणारे कांहीं विचार मला सुज्ञ वाचकांच्या विचारार्थ येथें मांडावयाचे आहेत

## २ निर्बंध व अनुनय

समाजसंघटनेच्याबाबतीत काही गोष्टी निर्बंधानी साधाव्या व काहीं अनुनयाने म्हणजे उपदेश, विनति, मनवळवणी, उत्तेजन, लोकशिक्षण इत्यादींनी, परंतु आचरण कर्त्याच्या मर्जीवर सोडून. परीक्षाच्या अभ्यासक्रमामध्यें जसे काही विषय आवश्यक व काही ऐच्छिक असतात त्याचप्रमाणे समाजस्वास्थ्यासाठीसुद्धा काहीं गोष्टीबाबत निर्बंध घालण्यात यावे व कांही गोष्टी स्वेच्छेने घडवून आणण्याचा प्रयत्न व्हावा, आवश्यक व ऐच्छिक, किमान व फाल्तू, अकरणात्मक व करणात्मक, कर्तव्यपूर्ति व उपकार अशासारखा हा फरक आहे प्रत्येक खरी गोष्ट सोबत्याना सागण्याचा माझेवर निर्बंध असू शकत नाही, पण सागेन तें खोटें असता नये असा मात्र निर्बंध आहे. मी वाटमारी करता कामा नये हा निर्बंध, वाटसरूची सेवा मी किती कशी करावी किंवा करू नये तो माझ्या मर्जीचा प्रश्न आहे

विनोबाजींनी देशापुढें व जगापुढें माडलेल्या थोर विचारांमध्यें असा कांही गोष्टी समाविष्ट आहेत कीं त्या निर्बंधाचा विषय होऊ शकतात. दुसऱ्याच्या श्रमांचा अपहार करू नये हा निर्बंध. श्रमदान करणे हा अनुनयाचा विषय आहे भूमीवर कोणाची अबाधित मालकी असतां नये असा निर्बंध असावा मी पिकवलेले धान्य मी अन्य गरजवतांनाहि द्यावे हा अनुनय होय निवडणूक न करणे हा निर्बंध, अपरिग्रह हा अनुनय निर्बंध ही पायाभरणी; अनुनय ही त्याच्या वरील उभारणी. अनुनय हाच श्रेष्ठ व परिणामकारक मार्ग आहे. कारण निर्बंधसुद्धां बऱ्याच्या संमतिविना केवळ बाह्य दडपणानें पूर्ण यशस्वी होत नसतो स्वयंप्रेरणेमध्येंच खरी शोभा व शक्ति आहे, आणि ही स्वयंप्रेरणा समजुतीनें, शिक्षणाने व आचरणानेंच साधेल. तथापि मनुष्य समाजनिष्ठ, म्हणजे समाजामध्यें ओतप्रोत मिसळलेला, असल्यानें त्याच्या प्रेरणांमध्यें स्वयंप्रेरणा व परप्रेरणा असा आत्यंतिक फरक रहात नाहीं बहुतांची जी स्वयंप्रेरणा तो एकेकट्यावरील निर्बंध बनतो. माझी

स्वतःची स्वयप्रेरणा म्हणजे सुद्धा माझ्यातील एका वृत्तीचा अन्य वृत्तीवरील निग्रहच असतो. मनवळवणीसाठी सुद्धा योग्य निर्बंध उपकारकच होतात

निर्बंधाचा प्रयोग म्हणजे दडप्रयोग असे आम्हाला म्हणावयाचे नाही. तर माणसाच्या कर्तव्यामध्यें सुद्धा निकडीची व सवडीची, किमान व फालतू, आवश्यक व ऐच्छिक, थडून बसण्याजोगी व स्वेच्छेवर सोडण्याजोगी असा भेद करावयास पाहिजे असे आम्हाला म्हणावयाचे आहे (१) माणसाने कोन्या जमिनीवर मालकी सागू नये व तिची किंमत किंवा खड मागू नये, व (२) मुद्दलफेडीपलीकडे कोणीहि व्याज, खड, भाडें, डिव्हिडड इत्यादि वसूल करता नये हे ठळक सकेत किंवा निर्बंध मला सुचवावयाचे आहेत या निर्बंधाच्या पालनाउपरांतहि माणसानें समाजाला स्वात्मापण करणे श्रेयस्करच ठरेल व तसें करणारे धन्यवादास पात्र होतील परतु वरील निर्बंध मोडणारे निषेधास पात्र होतील तसे स्वात्मापण न करणारे होणार नाहीत निर्बंध मोडणारे पापी ठरतील, अनुनय न मानणाराना पुण्यप्राप्ति होणार नाही पण पापहि लागणार नाही निर्बंधभगाचा दोष हा कृति-दोष ( सिन आफ कमिशन ) आहे, अनुनय न मानणाराचा दोष हा च्युतिदोष ( सिन ऑफ ओमिशन ) आहे निर्बंध हा आज्ञार्थ आहे, अनुनय हा विध्यर्थ आहे निर्बंध व अनुनय यामधील भेदाचे एवढें विवेचन पुरे

## ३ जीवन-शोधन

मनुष्य मुळात पशु होता जनावराप्रमाणेच वागत असे अजूनहि तो काही अशीं पशुच आहे कुत्री-माजरे जशी आपापसात वागतात तशीच माणसेहि वागतात धर्माचे भान किंवा जाणीव हेंच माणसाचे वैशिष्ट्य आहे "धर्मोहि तेपा अधिको विशेष ।" हे धर्माचे भानहि त्याला एकाएकी आले नाही, हळुहळूच होत गेले व अजूनहि पुर झालेले नाही हे भान व तदनुसार आचरण, घडेल तसतसाच तो पशुचा माणूस

बनेल. मनुष्याची निर्मिति, म्हणजे घडण, सृष्टिकर्त्याकडून अमुक इतके हजार वर्षांपूर्वी होऊन गेली असे नाही. ही घडण अखंड होतच आहे नवमानव व नवसमाज हे नित्यच घडत रहाणार. अहिंसक समाजरचना म्हणजे माणसाची घडणच होय पशुतेकडून मानवतेकडे आपली अखंड वाटचाल चालू आहे समाजधर्मांचे म्हणजे न्याय, सदाचार इत्यादींचे भान व पालन घडेल तसतसेच आपण खरेखुरे मानव बनत जाऊ.

## ४ न कळत पापें

आजवर आपल्याकडून अज्ञानपूर्वकहि अनेक दोष घडत आले आहेत. अज्ञानाने घडलेला दोष हा नैतिक दोष नसला तरी भौतिक दोष आहेच; त्याचे परिणाम आपल्याला भोगावेच लागतात. "न कळता पद अग्निवरी पडे। न करि दाह असे न कधी घडे॥" आजवर जातिभेद व अस्पृश्यता याचे पालन आपण त्यातील दोषाची जाणीव तर राहोव पण धर्म म्हणून करीत आलो. पण म्हणून त्याचे दुष्परिणाम थोडेच चुकणार? त्याचप्रमाणे जमिनीची मालकी, व्याज, खंड, भाडे, डिव्हिडंड, नफा इत्यादींचेद्वारा आपण जें एकमेकाचे शोषण करीत आलो त्याची आपल्याला जाणीव नव्हती या सर्व गोष्टी महाजिक किंवा स्वाभाविक म्हणूनच आम्ही चालविल्या. परिणामी समाजामध्यें विषमता व वैमनस्यें, निराशा व विलास, आळस व व्यसनें, कलह व युद्धें इत्यादि सहेतुक देखीं अनिष्टें याकून त्याचे दुष्परिणाम आपल्याला परोपरींनी बाधत आहेत. मानववंशामध्यें यादवी पराकाष्ठेला पोचली आहे. राष्ट्राराष्ट्रामध्यें शीतयुद्धें चालूच आहेत पण त्याच्या हि मुळाशी तुमच्या आमच्यामध्यें, भाऊभाऊंमध्यें, शेजाऱ्यापाजाऱ्यांमध्यें, चालू असलेली शीतयुद्धेंच आहेत हें आपल्या लक्षात आले नव्हतें आतां काहींना त्या दोषाची जाणीव झाली आहे इतरांनाहि ते दोष दाखवून देऊन सावध करणे हें त्यांचें कर्तव्य आहे दोषाची जाणीव होतांच ते दोष दूर होतील असे नाहीं. "जानामि धर्मं नच मे प्रवृत्ति। जानामि अधर्मं नच मे निवृत्तिः॥" अर्थात् मला धर्म कळतो पण वळत नाहीं,

अधर्म कळतो पण टळत नाहीं, हे खरे असले तरीहि धर्माची जाणीव व त्याचे पालन याचेमध्यें प्रयत्नाचा कमीअधिक काळ जावा लागतो एवढ्या अर्थानेंच तें खरे आहे धर्मपालनाची माणसाला आध्यात्मिक ओढ तर आहेच पण त्यालेरीज धर्मभगाचे भौतिक परिणामहि त्याला धर्मपालनाकडे ढकलीत नेतच असतात.

म्हणूनच आम्हाला विश्वास वाटतो की गांधी विनोबाची–आजवरच्या संतसज्जनाचीहि – शिकवण व सत्यांच्या आपल्या वागणुकीतील दोष आपण लोकाना नीट समजावून दिले तर विनोबाचे भूदानमूलक, ग्रामोद्योगप्रधान, अहिंसक क्रांतीचे स्वप्न साकार होणे अशक्य नाहीं

---

जमीन हें केवळ उत्पादनाचे साधन नाही, तर ते परमेश्वराच्या भक्तीचेहि साधन आहे. मी स्वतःच याचा अनुभव घेतला आहे ईश्वरभक्तीची जी जप, तप, ज्ञान इत्यादि साधने आहेत त्या सर्वांच्याद्वारा जेवढी ईश्वरभक्ति होते म्हणजे मनुष्याच्या विकार-शमनासाठीं त्या साधनाची जेवढी मदत मिळते त्याहून अधिक मदत जमिनीवर परिश्रम केल्याने व मोकळ्या हवेत कुदळ घेऊन काम करण्यानें होते

म्हणून एखवार हरिजनाना मदिर प्रवेश न मिळाला तरी चालेल, कारण ईश्वराचे दर्शन करण्याचीं व त्याचे दर्शन घेण्याचीं दुसरीहि साधनें आहेत पण भूमिहीनाना भूमीची सेवा हें ईश्वरभक्तीचे सर्वोत्कृष्ट साधन आहे. त्या साधनापासून कोणालाहि वंचित ठेवता कामा नये

– विनोबा.

# II शोषणाचे प्रकार व इलाज

## १ जमिनीची मालकी

जमिनीची मालकी हे शोषणाचे आद्य व ठळक साधन आहे. ईश्वर-निर्मित जमीन उघडी पडलेली होती ती माणसाने अडवली, बळकावली; इतराना त्या जमिनीत पाऊल टाकण्यास मज्जाव केला.

मनुष्य प्रथम शिकारजीवी होता; जनावराप्रमाणेंच भूक लागली की भक्ष्यार्थ फिरे आणि कंद - मूळें - फळें इत्यादि आयते मिळणारे अन्न खाई किंवा ससे, हरणे, कोंबडी, बकरी, गुरे यासारखे स्थळचर, कबडे, कबुतरे यासारखे खेचर किंवा मासे - कासवे यासारखे जलचर प्राणी मिळतील ते मारून कच्चेच खात असे.

पुढें मनुष्याने कोंबडी, बकरीं, मेंढरे, गुरे, घोडे, उंट इत्यादि पशुपक्षी पाळण्याची युक्ति शोधून काढली व तो गोपालवृत्तीने जगू लागला. आपले कळप चारावे, जरूर पडेल तेव्हा त्या पाळीव प्राण्याना मारून मांस खावे व कातडी पांघरावी, एका ठिकाणचा चारा संपला की आपापले कळप घेऊन चारा मिळेल अशा अन्य ठिकाणी जावे, अशा तऱ्हेने तो राहू लागला. या काळात त्याने कुटुंब – रचना केली व "गोत्रें" (म्हणजे गुराखी घराणी) बनली

आणखी काही काळाने त्याने शेतीची कला शोधून काढली शेतीचा शोध लागल्यानंतरच मनुष्य एका ठिकाणी घरे बांधून राहू लागला आणि अनेक कुटुंबांचे पुंजके बनले, म्हणजेच गावे वसली.

या अवस्थेतच प्रथम माणसानी जमिनीचे कब्जे करण्यास सुरवात केली सर्वच माणसे एकावेळी शेतीकडे वळली असे झाले नाही प्रथम एखादी-दुकटीं कुटुंबें जमीन धरून, घरे बांधून, स्थिर झालीं. त्यांचे पाहून आणखी आणखी कुटुंबें शेतीकडे वळत गेलीं. पहिल्या पहिल्या शेतकरी कुटुंबानी

मनमुराद जमिनी अडविल्या. मागाहून आले ते अगोदर वसलेल्याच्या वाटेला गेले नाही कारण पलीकडे आणखीहि पाहिजे तेवढी जमीन पडलेली होती त्यामुळें अगोदरच्या जबरदस्ताशी भाडण करण्याची आवश्यकता नव्हती परतु अशा तऱ्हेनें हां हा म्हणता साऱ्या जमिनी अडून गेल्या व नवीन येणाराना मोकळ्या जमिनी मिळेनाशा झाल्या तेव्हां मग जमिनीसाठीं भाडणतटे व मारामाऱ्यासुद्धा होऊ लागल्या पण साधारणपणे अगोदर येऊन वसलेल्या घरदाज व सघटित मालकाशी लढा देणे एकट्यादुकट्या नवख्या इसमाला अवघड जात असावे यावरूनच घरदाज म्हणजे 'मिष्किन्' व नवखा-परका म्हणजे 'घरीब' या फारसी शब्दाना विशिष्ट स्वभावदर्शक अर्थ प्राप्त झाले

सर्व जमिनी अशा तऱ्हेने अडून गेल्यानतर जी नवीन मण्डळी आली त्यानी अगोदरच्या मडळीला राजी करूनच रहाणे अपरिहार्य होतें म्हणून काही गरिबांनी मिष्किलाना नजराणे देऊन त्याचेकडून जमिनी विकत घेतल्या तर काहींनी खडकरी कुळें म्हणून राहण्याचे मान्य केले

एकाने जमीन अगोदर अडविली एवढ्याचसाठी मागाहून येणाऱ्या दुसऱ्याकडून पहिल्याला जमिनीची किंमत मिळावी किंवा खड मिळावा ही उघडउघड जबरदस्ती व पिळणूक होती

पूर्वीच्या राजेशाहीच्या काळात ही मालकी व अरेरावी खपून गेली पण आतां लोकशाहीच्या काळात ती चालणार नाहीं, वाजवी तर ठरणारच नाही राजेशाहीमध्यें राजा हा सर्वभूमीचा मालक असे आणि प्रजाजन त्याचे आश्रित होते परतु आता ते नाते राहिलेले नाही तरीहि एका सार्वभौम राजाऐवजी गावोगावी खातेदार नावाचे असख्य छोटे राजे बनलेत ज्याचे मालकीची जमीन आहे तो राव, ज्याचेपाशीं जमीन नाही तो रक असे दोन वर्ग पडणे वाजवी नाही जमिनीवर सर्वांचाच अधिकार आहे, म्हणजे अबाधित अधिकार कोणाचाच चालणार नाही कोऱ्या जमिनीची किंमत किंवा खड घेणे ही यापुढें पिळणूक व जबरदस्तीच ठरेल ती निषिद्ध आहे

## २ कष्टार्जित खंड

कोऱ्या जमिनीचा खड ही जबरदस्ती असली तरी सुधारलेल्या जमिनीचा खड हा कष्टार्जित खडहि असू शकेल. कोरी जमीन वेडी-वाकडी, काटयाकुटयानी भरलेली व नापीक होती. ती साफसूफ करणे, तिला बाध घालणे, सपाट करणे, वधारा घालून किंवा विहीर खणून त्या जमिनीला पाणी पुरविण्याची व्यवस्था करणे, कुपण करणे, झाडें लावून त्याची राखण करणे व ती शिपणे, खते घालणे इत्यादि कष्टसाध्य उपायानी त्या जमिनीची फलद्रूपता खूप वाढते. एकाने अशी स्वकष्टानी फलद्रूप बनविलेली जमीन दुसऱ्याला वापरण्यास देण्याचा प्रसग आला तर त्या दुसऱ्या शेतकऱ्याने पहिल्या शेतकऱ्याला त्या शेताच्या उत्पन्नाचा काही भाग खड म्हणून द्यावा हे न्याय प्राप्त आहे. कारण त्या जमिनीत येणारे पीक हे निवळ त्या दुसऱ्या शेतकऱ्याच्या चालू कष्टाचेच फळ आहे असे नाही. त्या पिकाचा काही भाग पहिल्या शेतकऱ्याच्या पूर्वश्रमाचे फळ आहे. चालू श्रमाचे फळ चालू शेतकऱ्यास मिळावे तसेच पूर्वश्रमाचे फळ पूर्वीच्या शेतकऱ्यास मिळावे हे उचित ठरेल.

मात्र हे श्रमजन्य खड कायम स्वरूपाचे नसतील, काही मुदती-पुरतेच असतील हेहि उघडच आहे. दहा–वीस वर्षांच्या श्रमानी मी एक फळबाग किंवा मळा तयार केला तर त्या बागेचा किंवा मळयाचा खड मला आणखी दहावीस वर्षापर्यंत मिळत रहावा हे उचित असले तरी तो तसाच यावच्चद्र दिवाकरौ मिळत राहाणें न्यायाचे नाही. वेगात आलेली आगगाडी एजिन बद झाल्यानतरसुद्धा मैलभर आपोआप जाईल किंवा सायकल फर्लांगभर जाईल पण अधिक नाहीं. त्याचप्रमाणे शेतीतील किंवा फळबागेतील श्रमाचे फळ ते श्रम बद झाल्यानतर काही मुदतीपर्यंतच मिळू शकेल, बेमुदत मिळणार नाही.

सध्या अशी स्थिति आहे की जमिनीचा खड ठरतो तो बहुधा कायमचाच. यांत नवल करण्यासारखें काहीं नाहीं कारण कोऱ्या जमिनीचे जेथें खंड आहेत तेथें सुधारलेल्या जमिनीचे खड विशेष प्रमाणात पण कायम स्वरूपात चालावे हे सहाजिकच आहे. " माझी जमीन, तुझे श्रम.

दोन्ही मिळून पीक येते त्याअर्थी तुझें अर्धे नी माझें अर्धे" हा सरळ न्यायसा वाटतो परतु त्यातील पहिले विधान "माझी जमीन" हेच चुकीचे असते "जमीन देवाची, श्रम पूर्वीचे माझे, चालू श्रम तुझे" ही सत्यस्थिति आहे

## ३ निसर्गाची देणगी

या सचित किंवा चालू श्रमाच्या फळाखेरीज जमिनीच्या उत्पन्नामध्यें निसर्गाची देणगी म्हणूनहि काही भाग असतो आंबे, फणस, काजू, कोकम इत्यादि बिनपाण्याच्या फळझाडाचेद्वारा मिळणारी निसर्गाची देणगी स्पष्टच आहे, पण भाताच्या किंवा गव्हाच्या गळयामध्यें किंवा लिंबा-सध्याच्या बागेमध्येंहि ती असतेच ही निसर्गाची देणगी साऱ्या समाजा-साठी आहे, म्हणूनच सरकार ती दस्ताच्या रूपाने वसूल करते. निसर्गाच्या देणगीवर मालकी समाजाची किंवा सर्वांची सारखी, एवढें मान्य झाल्या-नतर ती कराच्यारूपाने सरकारला पोचली काय, किंवा जमिनीची यथाप्रमाण वाटणी होऊन प्रत्येकाच्या वहिवाटीखालील जमिनीतील निसर्गदत्त देणगी त्याची त्यालाच राहिली काय, दोन्ही सारखीच

## ४ जमीन खरेदी

पण कोणी म्हणतील की आमच्या जमिनी अशा जबरदस्तीने बळकावलेल्या नसून आम्ही निढळाच्या घामाचा पैसा ओतून विकत घेतलेल्या आहेत आणि आम्हाला जो त्याचा खड मिळतो तो सेव्हिंग बँकेच्या व्याजापेक्षाहि कमी आहे, तीच रक्कम आम्ही बँकेत ठेवतो तर आम्हाला निर्वेध व्याज मिळत राहिले असते आम्ही आमची रक्कम जमिनींत गुतविली हा आमचा गुन्हा आहे काय ?

तो तुमचा गुन्हा नसला तरी ती तुमची आमची सर्वांची चुकभूल आहेच. तुम्ही जी जमिनीची किंमत दिली ती त्या जमिनीच्या सुधारणेचा किंमतच केवळ नव्हती, तर तीत कोन्या जमिनीच्या अडवणुकीची किंमतहि सामील होती ती दरवडघाच्या मालाची किंमत होती तुम्ही खरीद-केलेल्या सुधारणांची किंमत तुम्हाला कांही वर्षांच्या खडाच्या रूपाने वसूल

होऊन मिळावी हे रास्त आहे पण अडवणुकीची किंमत भरण्यात तुमची चूक झाली ती यापुढें दुरुस्त व्हावयास पाहिजे.

## ५ पागडी

मुंबईतील कित्येक भाडेकरू स्वत ची खोली दुसऱ्याला घेऊ देताना मधल्यामध्यें " पागडी " घेतात त्यापैंकीच हा जमीन खरेदीचा प्रकार आहे. तुम्ही त्या खोलीमध्यें काही टेबलें – खुर्च्या – तसबिरा माडल्या असल्या किंवा विजेचे दिवे, पखे इत्यादि बसविले असले तर त्या सामानाची किंमत घेणे गैरवाजवी नाही. पण " पागडी " घेणे जसे अनुचित आहे तशीच देवाची उघडी पडलेली जमीन एकानें जबरदस्तीने अडविली आणि ती अडवणूक दुसऱ्याला विकत दिली तर तो रास्त व्यवहार ठरत नाही.

पूर्वी राजेसुद्धा आपल्या राज्यातील मुलखाची अशीच खरेदी विक्री करीत असत उदा० मुबई बेट हे पार्तुगलच्या राजाने इग्लडच्या राजाला हुडघादाखल दिले गोव्याच्या पेडणे महालाचे ४५ गाव मूळचे(?) सावत-वाडीच्या राजाचे त्याने पोर्तुगीजाना विकत दिले। त्या काळी राजाना अशी निरकुश सत्ता असे. परतु आता जसा राजसत्तेचा लोप झाला तसाच भूमिसत्तेचाहि लोप व्हावयास पाहिजे. मोठी राज्यें गेली तशीच छोटीं राज्येंहि (जमीनमालक = भू-पति = राजा) गेली पाहिजेत

## ६ मनुष्याचा मूलभूत भूमि – अधिकार

मनुष्याचे कांही मूलभूत, जन्मसिद्ध किंवा अविभाज्य अधिकार आहेत की जे हिरावून, किंवा विकत, घेण्याचा अन्य कोणाला अधिकार नाहीं किंवा ज्याचा त्यालाहि देऊन टाकण्याचा अधिकार नाहीं. ते मानवधर्माचा भाग आहेत. उदा० मनुष्याची खरेदी-विक्री होऊ शकत नाही, मनुष्य स्वत ला विकून टाकू शकत नाही. गुलामगिरीच्या जमान्यात तसे चाले. धर्मराजानें द्रौपदीला जुगारांत पणाला लावले बाप आपलीं मुलें सावकारांना विकत देत. मुदतबंदी मजूर करारानें घेण्याची प्रथा हा गुलामगिरीचाच पर्याय होता म्हणून ती प्रथा बंद करण्यात आली राजा

हरिश्चंद्राने बायकोला, मुलाला आणि शेवटी स्वत लाहि विकून घेतले. हा मानवतेचा भग होता. आता तो लोकमनाला मान्य नाही व कायद्यालाहि मान्य नाही. त्याचप्रमाणें मुंबई–पुण्यासारख्या दाट वस्तीच्या शहरातील रहिवाशी आपल्या घराला लागून दुसरे घर बाधून देण्याचा म्हणजे स्वत ला लागणाऱ्या किमान हवा–प्रकाशाचा, हक्क दुसऱ्याला विकून किंवा देणगी म्हणूनहि देऊन टाकू शकत नाही मनुष्याला जसा आत्महत्या करण्याचा अधिकार नाही तसाच जीवनाची मूलभूत साधने स्वतःची देऊन टाकण्याचा किंवा इतराची त्याच्या समतीनेहि घेण्याचा अधिकार नाही

माणसाच्या जीवनाचे हवा, पाणी, आकाश, प्रकाश इत्यादीपेक्षाहि जमीन हे अधिक महत्वाचे साधन आहे प्रत्येक माणसाचा स्वत.च्या पोटापुरत्या जमिनीवर इतर सर्व मनुष्याच्या बरोबरीने अधिकार आहे. हा अधिकार अविभाज्य आहे स्वराज्य हा जसा प्रत्येक राष्ट्राचा अबाधित अधिकार आहे तसाच जन्माला आलेल्या प्रत्येक इसमाचा त्याच्या हिस्शाच्या जमिनीवर अबाधित अधिकार आहे महाराष्ट्राचे राज्य इग्रजाना देऊन टाकण्याचा बाजीरावाला जसा अधिकार नव्हता, तसाच आपली जमीन 'कोणत्याहि सवतीवर विकून टाकून आपल्या वंशजाना निर्वासित बनविण्याचाहि माणसाला अधिकार नाही, विकत घेण्याचा इतरानाहि अधिकार नाही, हिरावून घेण्याचा तर त्याहूनहि नाही अर्थात् ईश्वरी योजनेनुसार कोणी भूमिहीन नाहीं – जसा कोणी हवा – प्रकाश – हीन नाही आज जे भूमिहीन म्हटले जातात त्याची जमीन इतरानीं बळकावलेली आहे भारताचे राज्य इग्रजानी बळकावले त्याचीच ही छोटी आवृत्ति आहे. ब्रिटिश साम्राज्यशाहीचे निराकरण झाले तसेच जमीनमालकीचे निराकरण व्हावयास पाहिजे सेवामूलक मालकी राहील, सेवाशून्य मालकी रद्द होईल ही काळाची निकराची मागणी आहे.

## ७ व्याजबट्टा

जमिनीची मालकी हें इतरावर प्रभुत्व गाजविण्याचे व त्याचे शोषण करण्याचे आद्य व सर्वांत जबरदस्त साधन बनले. त्यातून आणखीहि शोष-

णाचे प्रकार निघाले. त्यामध्यें सावकारी किंवा व्याजवट्टा हा ठळक प्रकार आहे

ज्याने भरपूर व सुपीक जमीन अडविली त्याने कसलेहि श्रम न केले तरी श्रावण – भाद्रपद महिन्यात त्याचे कोठार धान्याने भरलेले रहाते व त्याच्याच कमनशीब व कमजमीन शेजान्याची त्या दिवसात उपासमार होऊ लागते. उपासमारीने गाजलेले गरजू लोक त्या गब्रूकडे उसने धान्य मागायला जातात आणि ते अडलेले असल्यामुळें उसनवारीची फेड सवाई दिढीनेहि करण्यास कबूल होतात. खरोखरी सावकाराच्या कोठारातील जादा, म्हणजे त्याच्या कुटुंबाची गरज भागून उरणारे, धान्य कोणी उसने न नेले तर वरडून वायाच जाईल. अर्थात् गरजवतानीं जुनें धान्य उसनवार नेऊन जेवढधास तेवढें विना काही कमी, ताजें धान्य परत केले तरी त्यात सावकाराचा फायदाच आहे परतु ऋणको असतो अडलेला आणि धनकोचे काही अडलेले नसतें, फारच तर त्याचे फालतू धान्यच वाया जाईल. त्यामुळें त्याचा पक्ष वरचढ असतो आणि तो घालील त्या अटी ऋणकोला मान्य कराव्या लागतात

परतु अडवणूक हें पाप आहे आणि व्याजाची मागणी ही सरळसरळ अडवणूक आहे आणि " सगळेच व्याज घेतात गरीब लोक आपापसातील व्यवहारांत तर विशेषच जबर व्याज घेतात ऋणको स्वखुषीनेंच करार करतो. " इत्यादि युक्तिवादांनी व्याजाचे समर्थन होत नाहीं. त्यापेक्षां " तो उसने नेतो महागाईच्या दिवसांत आणि परत करतो स्वस्ताईच्या दिवसात, बाजारभावांत पडणाऱ्या फरकापेक्षा व्याजाचा दर हल्का असतो " हें म्हणणे खरे आहे. पण त्याचा अर्थ एवढाच की, व्याजवट्टा हा कांहीं शोषणाचा एकच प्रकार नाहीं, नफा हाहि शोषणाचाच प्रकार आहे. नफ्याचा विचार आपल्याला स्वतंत्रपणे करावा लागणारच आहे

## ८ बियाणें वाढलें, फळप वाढतो

व्याजाच्या समर्थनार्थ मांडण्यांत येणारा मुख्य युक्तिवाद असा की, संपत्ति एका दृष्टीने विनाशी आहे तर दुसऱ्या बाजूनें अपार वाढत

जाणारीहि आहे. धान्य कोठारात बरडते तसेच ते मातीत पेरल्याने काही महिन्यांच्या अवधीत एकेका दाण्याचे शेंकडो दाणेहि बनतात. कोंबड्याच्या एका जोडप्यापासून वर्षभरात ५०, कोंबडी तयार होतात. गाय मर्त्य आहे खरी पण ती आठ – दहा वासरे ठेवून जाते. अर्थात् संपत्ति प्रसवशील आहे आणि विनाश ही त्या प्रसवाची छाया आहे. व्याज हा संपत्तीच्या त्या वाढीचा हिस्सा मात्र आहे.

आम्हीं जें धान्य दुसऱ्याला उसनवार देतो ते तो पोटासाठीच घेतो असे नाही, वियाण्यासाठींहि घेतो. आमच्या पासरीभर धान्यातून तो खंडी विकवील, मग त्याने त्या खंडीतून पाच शेराचे सहा शेर परत केले तर काय बिघडले ? पूर्वी ' धन ' म्हणजे गुरे – मेंढयाच असत. हें धन रानांत चरून पोट भरून येते आणि " दिनदूना, रात चौगुना " वाढत जातें, म्हणून मी तुम्हाला कोंबड्याची, मेंढयाची किंवा गुराची एक जोडी दिली तर वर्षभराने तुम्हीं मला पाच परत करूनहि तुमच्याकडे पुरेशी शिल्लक रहातील. सर्वच भांडवल अशा तऱ्हेने वाढत जातें. उदा० धनकोने दिलेल्या हजार रुपयातून ऋणकोने एकादी फळबाग तयार केली तर त्या बागेतून तो हजारो रुपये काढील. त्या पैशाची यंत्रसामुग्री घेऊन त्याने कारखाना काढला तरीहि त्या यंत्राच्या सहाय्याने त्याचे उत्पन्न खूप वाढेल व प्राप्तीहि वाढेल. त्या वाढीव प्राप्तीचा हिस्सा धनकोलाहि मिळणे उचित आहे. ऋणकोने त्या भांडवलातून व्यापार केला तरीहि तेजीमंदीचा फायदा घेऊन तो रुपयाचे दोन रुपये करणार. धनकोच्या भांडवलामुळें त्याला तो नफा मिळणार. मग त्या नफ्याचा अल्प हिस्सा धनकोला व्याजाच्या रूपाने का मिळू नये ?

या युक्तिवादाचा थोडया विस्ताराने विचार करावयास पाहिजे. संपत्ति गुंतवल्याने (Invest केल्यानें) वाढते हे खरे आहे. ही वाढ दोन प्रकारानी होते. (१) निसर्गाच्या कृपेने व (२) माणसाच्या श्रमांनी. माणसाच्या श्रमाचे पुन्हा दोन प्रकार. (१) संचित व (२) चालू. भांडवल म्हणजे संचित श्रम. भांडवल म्हणजे पैसा नव्हे तर गाडी, होडी, करवत, लॉरी, पंप, इत्यादि अवजारे किंवा साधनें कीं ज्यांचे साह्यानें

मनुष्याचे चालू श्रम अधिक सोपे व अधिक परिणामकारक बनतात. निसर्ग व संचित तसेच चालू श्रम या दोहोंनी मिळून संपत्तीची निर्मिति होते .

पूर्वकाळी या दोहोंमध्यें प्राधान्य निसर्गालाच होतें मनुष्य जेव्हा नरमासहि खात असे तेव्हा मी व निसर्ग याखेरीज तिसरी वस्तुच नव्हती. निसर्ग हे एक वाढलेले ताटच होते त्यातून लागेल तेव्हा हाती लागेल तेवढें उचलून खाण्याचे श्रमच तेवढे माणसाला करावे लागत. पण पुढें माणसाने नरमास वर्ज्य केले आणि पुढें काहींनी गोमासहि वर्ज्य केले. साऱ्या मानववंशाचे अशा तऱ्हेने एक कुटुंब बनले आणि त्या गोत्राचे गोवंशाशीहि नाते जुळले अशाने निसर्गाचे पारडें हलके झाले आणि माणसाचे पारडें जडावत आणि त्यावरोबर खालवत चालले. गोपालन युगामध्यें श्रमाचे महत्त्व वाढू लागले आणि आता कृषियुग विशेषच श्रमप्रधान बनले आहे निसर्गाच्या वाढलेल्या ताटाचे तोंड आवळत जाऊन त्याचा आता खोल अरुंद गळ्याचा चंबू बनला आहे! पूर्वी भांडवलहि नैसर्गिकच असे (कोंबडी, गुरे इत्यादि) आणि ते वाढेंहि नैसर्गिकरीत्याच. त्यावेळी धान्य म्हणजे वियाणेच होतें, ते कोठारात साठत नसे तर मातीतच गळे आणि पुढच्या मोसमात दसपट रुजे.

पण आता स्थिति पार पालटली आहे. आता तुम्ही शेत सपाट करून, बांध घालून, वेणून, खतावून, नागरून, भिजवून पेराल तेवढेंच 'वियाणें' व बाकीचे अन्न. पूर्वी खाल तेवढेंच अन्न व बाकीचे सारे बियाणे असे पूर्वी भांडवल हा निसर्गाचाच हिस्सा होता, आता तो श्रमाचा हिस्सा बनला आहे म्हणून पूर्वीच्या आरण्यक युगाचे न्याय सध्याच्या लागवडी युगाला लावता येणार नाहीत

या काळात पेरील त्यानेच कापावे, अर्थात् भोगावे, हाच न्याय उचित ठरतो. वियाण्याचे व्याज घेणे म्हणजे न पेरता कापणी करणे. न पेरता कापणे हा "रानटी" न्याय झाला! रानटी माणूस न पेरताच कापीत असे पण त्याकाळी संग्रह नसे आणि कर्जाचे व्यवहारहि नसत. म्हणून जुने दाखले नव्या काळाला लागू होण्याजोगे नाहीं तुमच्या कोठारातील धान्य हें 'वियाणे' नव्हे, तें वरडणारे धान्यच आहे. शेत-

कन्याच्या पाभरीतील धान्यच बियाणे होय म्हणून मशागतीने होणारी बियाण्याची वाढ शेतकऱ्यालाच लाभावी आणि तुमचे धान्य जेवढ्यास तेवढें तुम्हाला परत मिळावे हेच उचित किंबहुना थोडें कमी मिळालेलेहि चालेल जेवढ्यास तेवढें मिळण्यात तुम्हाला थोडें व्याजच मिळाल्या-प्रमाणे होते

जो न्याय शेतीच्या बियाण्याला लागू केला तोच अन्य प्रकारच्या उत्पादनालाहि लागू होतो, अ ने आपल्या श्रमानें कमाविलेलें व शिल्लक टाकून ब ला उसनवार दिलेले भांडवल अ ला परत मिळावयास पाहिजे, पण ते भांडवल उत्पादनात गुतविल्याने जी उत्पादनवाढ होईल ती मेहनताण्यादाखल उत्पादकालाच मिळावी ती उत्पादनवाढ जर त्याच्या वाजवी मेहनताण्याहून अधिक असेल तर त्या उत्पादनाचे विक्रीदर उतरून त्या वाढीचा लाभ स्वस्ताईच्या रूपाने सर्व समाजाला मिळावा, नाहीपेक्षा उत्पादन कराच्या रूपानें सरकारला म्हणजेहि सर्व समाजालाच मिळावा

## ९ बाया – बापड्यानीं काय करावे ?

व्याज निषेधाविरुद्ध दुसरा एक आक्षेप असा घेतला जातो कीं, तुम्ही जर व्याजाचे उत्पन्न बंद केले तर पोरकी मुले, विधवा, अपंग इत्यादि निराधार लोकाचे, की ज्याचा वाणो मिळवता नाही व जो पूर्वसंचित धनावरच अवलंबून आहेत अशाचे, कसे व्हावे ? विधवेच्या नवऱ्यान किंवा पोरक्याच्या आई – वडिलानी त्याच्यासाठी जें धन ठेवलेले असते, त्याच्या व्याजावर त्यांची कशीबशी गुजराण चालते व्याज बंद झाले तर त्याचे मुद्दल लौकरच संपुष्टात येईल आणि त्याचेवर उपास-मारीचा प्रसंग ओढवेल अशाचे व्याजाचे साधन तोडणे हा तुमचा निष्ठुरपणा होईल

पण हा ' आमचा " हि नाही आणि " निष्ठुरपणा ' तर त्याहून नाहीं तो आमचा नव्हे तर सृष्टीचाच नियम आहे आणि तो मानवाला हानिकारक नसून हितकरच आहे व्याजाचा अर्थ हाच होतो कीं, माझे वडील फार कुशल व कष्टाळू शेतकरी होते त्यामुळें माझें शेत आतां

विनाकष्टानें, न नांगरतां – पेरता, पिकावें व न कापतां – मळतां मला धान्य मिळावें. माझ्या वडिलानी किंवा आजोबानी एक लाख रुपये कमाविले व बँकेत ठेवले म्हणून मला दरसाल रु. ६००० काही न करतां मिळतात. ही आपोआप प्राप्तीची पद्धति फार छान वाटते. पण त्यासाठी मला कष्टावे लागत नसले तरी इतराना कष्टावेच लागते. त्याच्या कष्टाचे फळ त्याच्या तोंडी न लागता मला आयते मिळते एवढेंच. विधवाना व पोरक्या मुलांना जें व्याजाचे उत्पन्न मिळते ते इतरांच्या श्रमांतून निर्माण होते त्या इतरामध्यें काही विधवा व पोरकी मुलेहि असतील. एका विधवेला आयते मिळते याचा अर्थ दुसऱ्या विधवेचे पोराबाळासह कष्ट करूनहि पोट भागत नाही. व्याज म्हणजे स्वामित्वाचे मोल. स्वामित्वामुळें कर्तृत्वावर अन्याय होतो. ऐतखाऊला जें आयते मिळते ते बापा – बापड्याच्या निढळाच्या घामाची कमाई त्याच्या तोंडची काढूनच मिळते. तोच खरा निष्ठुरपणा आहे आणि त्याच्या निरसनासाठीच व्याज वसुली बंद व्हावयास पाहिजे आहे. अर्थात् व्याजबंदी हाच दयाळूपणा; व्याज म्हणजेच निर्दयता.

## १० उसनवारी ही अनुचितच

व्याजाची सावकारी म्हणजे जशी पिळणूक तशीच उसनवारी ही सुद्धा बहुधा एक प्रकारची पिळणूकच आहे. अत्ता मी तुमचे शभर रुपये विनाकष्ट पदरात पाडून घेणार आणि भविष्यकाळाने – की जो माझ्या हातचा नाही त्यानें – ते सव्याज फेडावे असा हवाला देणार; मी घेऊन खाईन आणि माझ्या मुलाने ते उपास काढून फेडावे, असे म्हणण्याप्रमाणे हे आहे. हा एक नवरचा ऐतखाऊपणाच आहे. उसनवारी बहुधा आळस, ऐदीपणा, उधळखोरी, व्यसने, मिजास, कोती दृष्टि इत्यादीतूनच उद्भवते. ऋणको मोहग्रस्त मूढ असतो व धनको लोभी. एकाच माळेचे मणी. जशास तसे !

असला धनको – ऋणको संबंध हा पापीसंबंधच होय. असला व्यवहार घडूनच वावा नये. कोणालाहि कर्ज देण्यापूर्वी त्याची ती मागणी वाजवी आहे की नाही याची खात्री करून घ्यावयास पाहिजे. गैरवाजवी मागणी

आपण येथें जो विचार करीत आहो तो मुख्यतः आत्मशुद्धीच्या किंवा अर्थसुचितेच्या म्हणजे निष्पाप जीवनसरणीच्या, हेतूने करीत आहो. हरामाचे मिळत असले तरी तें खाण्याची माझी मलाच इच्छा नाही. मग समाज मला तसे करण्यास भाग पाडू शकतो की नाही याचा प्रश्नच उद्भवत नाही मात्र त्याबरोबरच समाजानेसुद्धा अशा व्यवहाराचे सुनियन्त्रण कसे करावे त्याच्या पद्धति विचारपूर्वक ठरविणे आवश्यक आहे.

येथें आपण व्याजाची किंवा भाड्याची मागणी साफ नाकारीत नाही, तर व्याज हा मुद्दलफेडीचा व भाडें हा किंमतीचा हप्ता समजला जाईल व पूर्ण फेड होताच हप्ते बंद होतील. श्रमशून्य वाढ हीच अनैसर्गिक, अन्याय्य व हानिकारक आहे. तिचाच फक्त येथें निषेध आहे.

## १२ डिव्हिडंड

कंपनीच्या शेअरवर मिळणारे " डिव्हिडंड " ( हिस्सा ) हाहि व्याजाचाच एक प्रकार आहे कर्ज–व्यवहारामध्यें धनकोला ऋणकोच्या नफ्यातोट्याचे जोखीम पत्करावे लागत नाही. " शेअर – होल्डर " ( कंपनीतील हिस्सेदार ) नफ्यातोट्याचे जोखीम पत्करतो. ठेवीदाराच्या तुलनेनें तो अधिक जबाबदार असतो त्याबद्दल कारखान्यात किंवा व्यापारात गुंतविलेल्या भांडवलावर त्याची मालकी अबाधित राहून शिवाय नफा झाल्यास त्याचा हिस्सा त्याला अखंड मिळत रहातो. अर्थात् डिव्हिडंड हें शुद्ध व्याज नव्हे, त्याला नफाच म्हणावयास पाहिजे. तथापि नफा हा विक्रीदरांवर अवलंबून असतो आणि ते विक्रीदर ठरविताना भांडवलावर थोडेंतरी व्याज सुटेल असा बेतानेच आकारले जातात. अर्थात् नफ्यामध्यें व्याज अंतर्भूत असते. व्याजाखेरीज , नफ्यामध्यें काही रास्त बाबी समाविष्ट असतात :

(१) घटवट भरपाई ( प्रासंगिक नुकसानीच्या भरपाईसाठीं बाजूला काढून ठेवावयाची रक्कम; (२) विकास निधी ( धंद्याची वाढ करण्यासाठी ) (३) धर्मदाय इत्यादि. त्याखेरीज धंद्यामध्यें जोखीम असतें त्याचाहि मोबदला नफ्यामध्यें असतो व्याज व जोखमाचा मोबदला

याच्या रूपाने भाडवलदाराला वाढ मिळणें रास्त नाही नफा रहात असेल तर तो कामगार व गिऱ्हाईक यांचेमध्येंच वाटला जावयास पाहिजे. लहानथोर कामगाराचे पगार वाढावे किंवा गिऱ्हाईकाना स्वस्त दर मिळावे धद्यामध्यें काहीं जोखीम असेल तर तें एकटयादुकटया किंवा थोडथोडक्या मडळीवर न पडता त्याची सार्वत्रिक वाटणी व्हावी हेच उचित. म्हणजे जोखमाचे परतु जीवनावश्यक धदे सरकारने किंवा लोकल बोर्ड, ग्रामपचायत इत्यादीनीच चालवावे, किंवा त्यातील आयता फायदा किंवा अपरिहार्य नुकसान ही भोगावी समाजामध्यें जोखीम पत्करणारे काही धाडशी व बाकीचे म्याड, धाडशी भाडवलदार व म्याड कामगार असा भेद असू नये.

भाडवलदाराला ' स्लिपिंग पार्टनर'च ( निद्रिस्त सहकारी ) म्हणतात. ' निद्रिस्त ' तो सहकार्य कसे करणार ? " जो सोवत है सो खोवत है " हा न्याय योग्य आहे. निद्रिस्त भागीदाराला त्याचे भाडवल म्हणजे सांठविलेली कमाई भोगली म्हणजे झाले. कामगार व ग्राहक याच्या रास्त भोगवटयाचा अपहार त्यानें करू नये

## १३ व्याजाऐवजीं विकास – कर

मनुष्य–सख्या सतत वाढनच जाणार. त्याच्या गरजा किंवा जीवनमान वाढत जावे हेंहि उचित ठरतें आमच्या पूर्वजांच्या श्रमाची फळें– रस्ते, पूल, रेल्वे, बीज, धरणे, कालवे, यत्रें, बागा / इत्यादि– आम्ही आयती भोगतो व पूर्वजांच्या तुलनेने अधिक समृद्धि भोगतो. त्याची फेड आमच्या वशजाना सध्याच्या जगाहून अधिक समृद्ध जग ठेवून जाण्यानेच होऊ शकेल वाढती सख्या व वाढती समृद्धि यासाठी उत्पादन दवढ वाढीनें वाढत जावयास पाहिजे उत्पादनवाढीसाठीं वरील सर्व प्रकारचे भाडवलहि वाढावयास पाहिजे : आणखी शेतें, आणखी आणखी बागा, आणखी रेल्वे, आणखी इजिनें – हवे, ' आणखी चाम्या, आणखी माग, आणखी घरे इत्यादि हे भाडवल वाढायचे तर चालू उत्पादन सगळेंच उपभोगांत किंवा उपभोगाच्या वस्तू बनविण्यात खपवून

न टाकता त्याचा काहीं भाग बचावून भाडवली साधने बनविण्यात खर्चा-वयास पाहिजे ही विकासाची किंवा वाढीची जबाबदारी प्रत्येक उत्पादकावर येऊन पडते

भाडेकऱ्यानें घरमालकाला घराच्या किंमतीपलीकडे भर्डे द्यायला नको, पण त्याने घराला आणखी एकदोन गाळे मात्र बाधले पाहिजेत विणकाम कारखान्यानें भाडवल पुरविणाराला मुद्दल फेडी उपरात व्याज द्यायला नको पण त्याने आणखी माग चालू केले पाहिजेत.

मात्र उत्पादकाची प्रथम जबाबदारी साधना – अवजाराची झीज भरून काढण्याची राहील व नतरच त्याची वाढ करण्याची. त्याने मुद्दल द्यावे मागच्याना व व्याज द्यावे पुढच्याना. *

* टीप – हे कसे घडवून आणायचे, विकासवार्य उत्पादकानी एकेकटयाने, सघश की समाजाच्याद्वारा पार पाडावे तो व्यवस्थेचा प्रश्न आहे आपण धर्माचा विचार केला.

मागच्याना व्याज भरीत रहाणे ही भूत – बाधा– भूतकालाची भावी विकासाला होणारी बाधा– म्हटली पाहिजे. पितराचे ऋण फेडण्याचा मार्ग त्याचे पुतळे माडून त्याची पूजाअर्चा करणे हा नव्हे तर मुलाबाळाचे सगोपन हाच पितृ ऋण फेडण्याचा योग्य मार्ग होय त्या उलट प्रत्येक पितराचा जर आपण पुतळा उभारीत गेलो तर सारे घर निर्जीव पुतळयानी भरून जाईल आणि जीवत माणसांना जागाच उरणार नाही प्रत्येक मृताची कबर अभग ठेवण्याचे धोरण अगिकारल्यास शेतीची जमीनहि कबरींनींच भरून जाईल आणि साऱ्या गावाचेच कब्रस्तान बनेल ! व्याजाच्या दुष्ट प्रथेपायी आज नेमके तच घडत आहे एकदा ज्यानी पुरेशी बचत केली त्याना पिढयान् पिढया बैठे पोसावे लागत आहे काही काळ श्रम व बचत की मग निरतर विनाश्रम प्राप्ती. जो एकदा या बचतजीवी वर्गात दाखल झाला तो कायमचा अपग बनला परिणामी उत्पादक श्रम करणारावर त्या ऐतखाऊचा भार पडत असून उत्पादकाची सख्या घटत व भार झपाटयाने वाढत चालला आहे एकीकडे

भेद वाढत आहे, दुसरीकडे कृशता. मानव समाजामध्यें अनुत्पादक भक्षक व उत्पादक भक्षित असे वर्गभेद पडत असून ते अधिकाधिक तीव्र बनत आहेत. यातून अखेरीस केंव्हातरी भक्षित हे खंगून मरतील व भक्षकाना भक्षण करायला कोणी राहिले नाहीं म्हणून तेहि मरून जातील ! मानवजातीचा संहार होण्यासाठी अणु – युद्धेंच पाहिजेत असे नाहीं, व्याजाचे टाइम – बॉम्बहि ते काम बिनबोभाट पार पाडतील !

## १४ विनाशी संपत्ति व अविनाशी नाणीं

सर्वप्रकारची वास्तविक संपत्ति विनाशी असते. संपत्ति म्हणजे उपभोगाच्या विविध वस्तु. अन्न, वस्त्र, घर, मोटर, रेडियो, दिवे, पुस्तकें, माडीं, खुर्च्या, दागिने, फुले, चित्रें इत्यादि, यातील फुले, फळें, दूध अल्पायुषी आहे तर सोन्यारुप्यासारख्या वस्तु दीर्घायुषी आहेत पण अजरामर कोणत्याच नाहीत. तरीसुद्धा सोने जवळजवळ अजरामर आहे. त्या त्याच्या अमरत्वामुळें व सुटसुटीतपणामुळेंच त्याचे एवढें प्रस्थ माजले आहे. सोन्याचा उपयोग अलंकारासाठी, औषधामध्यें, बल्हईसाठी किंवा आणखीही काहीं उत्पादक उद्योगामध्यें होतो पण आज जी सोन्याला भलतीच किंमत आली आहे ती त्याच्या या उपयोगासाठी नव्हे. तर केवळ संग्रहासाठी. उपयुक्ततेच्या दृष्टीनें सोने म्हणजे 'स्टेनलेस पितळ'च आहे त्यादृष्टीने त्याचे मूल्य पितळेच्या पाचसात पट असण्यास हरकत नव्हती. पण हजारोपट किंमत वाढली ती केवळ त्याच्या संग्रहामुळें. सोन्याचा शोध लागण्यापूर्वी दुभते, फळें, फुले किंवा अंडी, मांस इत्यादीच काय, पण धान्यसुद्धां स्वतःला पुरून उरणारे इतरांना देऊन टाकण्यालेरीज गत्यंतर नसे. चामडें, तांबें, लोखंड यांसारख्या अधिकाधिक टिकाऊ व उपयुक्त वस्तु हाती लागत गेल्या व वस्तुविनिमय वाढत चालला तसतशी माणसाची प्रवृत्ति त्यातल्या त्यात टिकाऊ वस्तूंच्या संग्रहाकडे व त्यासाठीं अल्पायुषी वस्तु देऊन टिकाऊ वस्तु घेण्याकडे वळत चालली व टिकाऊ वस्तूंच्या अगच्या उपयुक्ततेच्या प्रमाणांत त्यांचे विनिमय – मूल्य म्हणजे किंमत वाढत गेली. उरणाच्या वस्तू इतराना घेऊ देण्याऐवजीं त्या देऊन

मोबदल्यांत अदल बदल होईना. पण टिकाऊ व संग्रहयोग्य संपत्ति जोडण्यांत येऊ लागली. सोन्याने तर इतर साऱ्या वस्तूंना मागें टाकले. दुधाचे किंवा फुलाचे सोने करून ठेवले की ते अभंग रहाते व त्याचे केव्हाहि परत दुभते, फुले, फळें किंवा म्हणू ते, बनविता येते.

देवघेवीच्या सोयीसाठी तांबें, रुपें, निकल, सोनें याचे प्रमाणशीर लहानमोठे शिक्क्याचे तुकडे बनविण्यात आले त्याना आपण नाणी म्हणतो.

सोन्याच्या शोधामुळें व नाण्याच्या योजनेमुळें मनुष्याची संग्रहशक्ति व परिणामी लोभ हीं अनावर झालीं. खरोखरी नाणी म्हणजे संपत्ति नव्हे तर संपत्तीदर्शक मुद्रा नाणीं म्हणजे चिठ्या किंवा कुपनें. नोट या इंग्रजी शब्दाचा मूळ अर्थ चिठी असाच आहे. डेरीचीं कुपनें आपण घेतो ती फक्त विशिष्ट डेरीकडे, दुधापुरतीं व महिन्याभरापुरतींच चालतात, पण नाणी ही सर्वत्र व सर्व प्रकारच्या वस्तूसाठी किंवा सेवेसाठी चालणारी कुपनें आहेत. पण मौज अशी की, सर्व प्रकारची वास्तविक संपत्ति ही विनाशी असते तर ही बदली संपत्ति मात्र अविनाशी

पैशाचे अशा त-हेने स्तोम वाढल्याने नाना प्रकारचे अनर्थ उद्भवतात. मुख्य अडचण अशी कीं पैशाचे मूल्य अनिश्चित असते. शेरभर धान्य माझ्या पोटाला दोन दिवस पुरेल याची मला खात्री असते पण एका रुपयात माझी न्यहारी तरी भागेल की नाही ते बदलत्या बाजार भावावर अवलंबून राहील त्यामुळें पैसा कितीहि साठविला तरी पुरेसा होतच नाही त्यामुळेंहि पैशाचा लोभ अमर्याद बनतो

ज्या शेतकऱ्यापाशी, शेतीवाडी, गुरेढोरे, घरगोठा, झाडमाड इत्यादि साधने आहेत, ज्याचे मुलगे निरलस, निरोगी व सुस्वभावी आहेत, ज्याचे शेजाऱ्यापाजाऱ्याशी कसलेहि हेवेदावे नाहीत, तो " माझ्या मुलाबाळाना काय कमी आहे ? " असे म्हणून निर्धास्त चित्तानें मृत्यूचे स्वागत करू शकतो, पण हा निर्धास्तपणा लक्षाधीशाचे नशिबी नाही, एक लक्षाऐवजी दान लाख असते तर अधिक बरे झाले असते अशी रुखरुख त्याला नित्य वाटतच रहाणार

वास्तविक संपत्ति प्रमाणाबाहेर वाळगताच येत नाही परंतु पैसा – नोटायायी मनुष्याची संग्रहवृत्तीहि अमर्याद बनते सामगी नागरिकापाशी बंदुका व दारुगोळा याचा प्रमाणापलीकडे साठा झाल्यास समाजाला तो धोकाच असतो. त्याचप्रमाणे पैसा म्हणजेसुद्धा शस्त्रच आहे नाणी म्हणजे गोळ्या नसल्या तरी टिकल्या तर आहेतच आणि त्याचा मारा करून वाटेल तशी उलथापालथ करता येत, अनेकाना अनेक प्रकारे मुठीत किंवा नामोहरम करता येतें

शिवाय पैशाच्या व्यवहारात पैसेवाल्या व्यापाऱ्याचे फावते आणि वस्तुमान् शेतकऱ्याची फसगत होते वस्तूंचे पैशातील भाव निरनिराळ्या मूल्यमान निरनिराळे असतात, त्याचा माहितगार व्यापारी मिळवितात व तिचा स्वतःच्या स्वार्थासाठी उपयोग करून अन शेतकऱ्यांना नागवितात व्यापारापेक्षा उत्पादनाला अधिक महत्व असावयास पाहिजे, पण पैशाच्या खेळामुळें शेतकरी किंवा उत्पादक यांची हातातोंडाशीच गाठ असते पण निरोप्ये दलाल व व्यापारी मात्र गब्रू बनतात

आणखीहि अनेक प्रकारे पैशाचा वडेजाव अनर्थकारक झाला आहे; त्याच व्यवहाराला एक प्रकारे सट्टेबाजीचे स्वरूप प्राप्त झाले आहे.

## १५ नाणें – घट

यासाठी पैशाला त्याच्या वाजवी मर्यादेत ठेवण्याची काही युक्ति निघावयास हवी. पैशाला अवास्तव महत्त्व येण्याचीं दोन कारणे आपण पाहिलीं ( १ ) त्याचा सुटसुटीतपणा, संग्रहाची व वहातुकीची सोय, व ( २ ) त्याची अमरता. यांपैकी सुटसुटीतपणा हा इष्ट म्हणजे आपण इच्छिलेलाच आहे. पण अमरता ही अनपेक्षित रीत्याच आपल्या माथीं बसली आहे पैसा म्हणजे कुपनें पेट्रोल हिंडविण्यापेक्षा पेट्रोलचीं कुपने हिंडविणें सोयीचें. शिवाय पेट्रोल गळून, उडून जाते ते भय कुपनाना नाही. पण पेट्रोलचीं कुपनें मुदतबंदी असतात. तशीच नाणीहि मुदतबंदी असावयास पाहिजेत, १९५८ चीं नाणीं किंवा नोटा १९५९ साली जशाच्या तशा चालता नयेत. त्या नाण्यांनी दर्शविलेल्या धान्य, घासलेट, लोखंड इत्यादि वस्तु जशा नाशिवंत व कालांतराने घटणाऱ्या आहेत तशींच नाणींसुद्धा घटत गेलीं पाहिजेत. १९५८ चे . १०० " ५९ सालीं ९५ व " ६० साली ९५ चे ९५ टक्के व्हावयास पाहिजेत वजनाचे कांटे व मापें ज्याप्रमाणे दरसाल शिक्का बदलून घ्यावीं लागतात त्याप्रमाणें नाणीं - नोटासुद्धा वर्ष बदलताच नवीं करून घ्यावयास पाहिजेत आणि तीं तशी बदलून घेतांना त्यांत ५ टक्के (किंवा ठरेल तेवढी) घट व्हावयास पाहिजे. हें यामधी व निसर्गाला धरूनच होईल. वस्तुत संपत्ति विनाशी असतां हा बदलो संपत्ति अविनाशी होणें आणि उलट याजानें आपोआप वाढत जाणें हीच विकृति आहे त्या विकृतीचे वरील उपायाने निराकरण होईल.

## १६ " पैसे गुंतविणार नाहींत "

आमच्या व्याज – भाडें – डिव्हिडंड – नफा नियमनांमुळे एक सवलत उद्भवण्याचा संभव आहे कीं पैसे गुंतवण्याला उत्तेजन देण्याने किंवा घरांमध्ये किंवा यंत्रसामुग्रीमध्यें पुनर्विनियोगानें माझा घर ताबडतोब लाभ नसेल तर मी

ते पैसे स्वत पाशी साठवूनच ठेवीन, उपयुक्त कामी गुंतविणार नाही. त्यासाठी मला काही आमिष पाहिजे.

*उलटपक्षी विनाश्रम प्राप्तीहि अन्याय्य व हानिकारक आहे हे* आपण पाहिले.

यातून मधला मार्ग असा निघू शकतो की नाण्यांच्या साठवणीला जी वार्षिक ५ टक्के घट लागू होते तीतून आंशिक किंवा फारच तर संपूर्ण मुक्तता ती नाणी दुसऱ्याला उसनवार देणाराला किंवा भाडोत्री साधनात गुंतविणाराला मिळावी; म्हणजे १०० रुपयाचे ९५ होण्याऐवजी उसने दिलेले रुपये शभराचे ९८ परत मिळावे किंवा फारच तर १०० चे शभरहि मिळावे. उसनवार दिलेले धान्य मणाचे ३८ शेर मिळण्याऐवजी ३९ किंवा पुरे ४० शेरहि परत मिळावे. असाने मालकाला काही टक्के व्याज मिळाल्याप्रमाणेच होईल. ते व्याज "घटींत सूट" या स्वरूपाचे असल्यानें बाधक होणार नाही. मात्र कोणत्याहि परिस्थितीत ही 'सूट' घटीपलीकडे जाणार नाहीं, म्हणजे नाणी घटण्याऐवजी वाढणार नाहींत, एवढी मर्यादा संभाळली जावी.

## १७ नाण्यांचा दुष्काळ ?

काहीं मंडळींनी आपलेजवळील रक्कम इतरांचे उपयोगी पडू न देता पेटी बंद केलेल्या तरी त्यामुळें चलनाचा तेवढा तुटवडा जाणवण्यापलीकडे काहीं अडचण उद्भवेल असें नाही. "तेवढी संपत्ति वाया गेली" असें होणार नाही, कारण ती संपत्ति नव्हतीच खरी संपत्ति, म्हणजे जीवनसाधनें, घटत नाहींत नाण्याचा तुटवडा म्हणजे अन्नाचा तुटवडा नव्हे.

तथापि राष्ट्राच्या संपत्तीचेसुद्धा समाजांत सुरळीत रुधिराभिसरण होण्यासाठीं चलन म्हणजे नाणी हें साधन किंवा वाहन आहे नाण्याच्या अभावीं वस्तुविनिमय अडचणीचा होऊन बसेल. लोकसंख्या, देशाचा विस्तार, दळणवळणाची साधनें, यांच्याशिवाय संपत्तीचे माप व तिची आवश्यक असणारी उत्पादन इत्यादि बाबी लक्षांत घेऊनच सरकार व्यवहारांतील

चलन वाढवीत किंवा आखडीत असते. नाण्याची साठेबाजी झाल्याने ते प्रमाण विघडेल व "नाणा – भीड" (नाण्याची चणचण) उद्‌भवेल

एवढी अडचण होईल खरी, पण तिच्यावर सुलभ उपायहि असा काढता येईल की व्याजनिरसनापायी होणाऱ्या चलन साठवणीचा अदाज घेऊन तेवढ्या प्रमाणात चलनाचा पुरवठा वाढविता येईल या प्रश्नाचा अधिक विचार अनुभवी अर्थशास्त्रज्ञानी करावा आम्ही राज्यकारभाराच्या व प्रत्यक्ष आर्थिक व्यवहाराच्या बाबतीत अगदीच अनभिज्ञ आहो तथापि त्यामुळें व्याज निषेधाच्या स्वयसिद्ध नैतिक सिद्धाताला यत्किंचित्‌हि बाध येत नाही

## १८ सोन्यावर नियंत्रण

तुम्हीं नाणी सालोसाल घटविण्याचे योजले तर नाण्याऐवजी सोन्या-रुप्याचाच सग्रह करण्याचे लोकाचे प्रयत्न सुरू होतील, कारण सोनें - रुपें कालातराने जीर्ण होत नाही, किंवा त्याचे बाजारभावहि विशेष बदलत नाहीत. त्यामुळें नाणी ठेवण्याऐवजी सोने - रुपें सग्रही ठेवण्यानें नाणे घट चुकवित येईल यासाठी सोन्या - रुप्यावर नियत्रण पाहिजे नाहींतरी अलीकडे विशेष कोणी सोन्या - रुप्याचा सग्रहार्थ उपयोग करीत नाहीतच नोटा व बँकेतील ठेवी हे सग्रहाचे सोन्यापेक्षाहि अधिक सोयीस्कर प्रकार निघाले आहेत. फक्त अडाणी लोक सोन्याचा सग्रह करतात व शहाणेसुरतेहि गुप्त सग्रहासाठीं सो याचा आश्रय घेतात. आतरराष्ट्रीय देवघेवीसाठी सोन्याच्या लगडीची जरूर पडे तीहि अलीकडे पडत नाही बरोचशी देवघेव वस्तूच्या रूपानेच होते व वर्ल्डबँकेमाफत प्रत्यक्ष ऐवजाखेरीज करता येते

सोन्याला अवास्तव किंमत आल्यानें पुष्कळसे मनुष्यबळ, की जें अन्नवस्त्रादीच्या उत्पादनाकडे लागावयाचे तें नाहक सोन्याच्या खाणीमध्यें गुतून गेले ही मानवसमाजाची मोठी हानि आहे. म्हणून आता यापुढें नवीन सोने उकरून काढण्याचे बद करण्यात यावे सध्या पृथ्वीतलावर असलेले सोने पूर्वीच वाजवी उपयोगासाठी पिढ्यान् पिढ्या पुरू शकेल. केवळ सग्रहार्थ सोन साठविणे कायदी चलनाच्या योजनेनंतर अनावश्यक,

अप्रयोजक व हानिकारक आहे म्हणून फक्त चालू वाजवी उपयोगासाठी सोन्याचे प्रमाणशीर वाटप करण्यात यावे व सोन्याचे अतिरिक्त साठे सरकारने ताब्यात घ्यावे

संभव आहे की राज्य कारभाराच्या दृष्टाने याबाबतीत अनेक अडचणी उद्भवतील व अनेक प्रकारच्या तडजोडी कराव्या लागतील हे मान्य करूनहि ही सूचना तत्वत मान्य व्हावयास पाहिजे व ती शक्य तो अमलात आणली पाहिजे असा

## १९ नफा

शोषणाचा आणखी एक मोठा प्रकार व्यापारातील नफा हा आहे गिऱ्हाइकाच्या अज्ञानाचा, भोळेपणाचा किंवा अडचणीचा फायदा घेऊन उकळलेल्या गैरवाजवी नफ्यालाच हे विधान लागू आहे असे नाही तर बाजारभावाच्या चढउतारामुळें मिळणारा नफा ही सुद्धा विनकष्टाची प्राप्ती आहे, इतराच्या हानीतूनच ती शक्य होते अर्थात् ती पिळणूकच आहे

तो हेतु पर सर केलेली नसते हे खरे त्या व्यापाऱ्याला कधी नफा मिळतो तसा कधी तोटाहि सोसावा लागतो, एका व्यवहारात फायदा मिळतो त्याचवेळी दुसऱ्या एखाद्या व्यवहारात ठोकरहि बसत असते म्हणजे हा नफातोटा जुगाराच्या स्वरूपाचा असतो पण जुगार खेळणे हे अनुचितच आहे

व्यापारातील वाजवी खर्च—वहातूक, वहातुकीतील धोके किंवा त्याचा विमा, सांठवण, साडणे—सडणे, कामगाराचा मेहनताना इत्यादि—विक्री दरात चढण वाजवी आहे, अर्थात् तेवढ्या मर्यादेपर्यंतचा नफा वाजवी आहे पण त्यापलीकडे तेजीमदीमुळें होणारा नफातोटा नाहक आहे, नफाहि नाहक व तोटाहि नाहक

यासाठी व्यापार हा मुळी खासगी तन्हेनें चालूच नये तो सामुदायिकच असावा, सहकारी पद्धतीत म्हणजे ग्रेते—विक्रेते एकच अशा तन्हेने चालावा किंवा ग्रामपंचायत म्युनिसिपालिटी, लोकलबोर्ड इत्यादींनी चालवावा, म्हणजे तेजामंदी एकाचे माथी न बसता सर्वत्र वाटली जाईल

## २० विषम मेहनताना

शोषणाचा आणखी एक सार्वत्रिक प्रकार आहे वेतनातील किंवा मेहनतान्यांतील विषमता प्राथमिक शिक्षकाला पगार सत्तर, माध्यमिक शिक्षकाला दोनशें आणि कॉलेजातील प्रोफेसराला पाचशें, तलाठ्याला रु ८०, मामलेदाराला रु २५० आणि कलेक्टरला रु १५०० लोहाराचा रोज रुपया, ताबटाचा दोन रुपये व सोनाराचा पाच रुपये हरिजनाने गावाची चाकरी करावी आणि त्याबद्दल त्याला पगार काय ? तर अन्नासाठी मृतमास किंवा गावातील उष्टेंमाष्टें आणि वस्त्रासाठी स्मशानातील कफने !

खरोखरी न्यायाधिष्ठित समाज व्यवस्थेमध्यें सर्व प्रकारच्या समाजोपकारी कामाची प्रतिष्ठा व प्राप्ति समान असावयास पाहिजे ज्याला सरासरीहून अधिक मिळतें म्हणजे सरासरी श्रम करून सामान्याहून वरच्या दर्जाचे जीवनमान जगता येते तो कळत नकळत शोषक आहे ज्याला सरासरीहून कमी मिळते तो शोषित आहे हे शोषण केंव्हा कसे किती घडत ते नेमके दाखविता येत नाहीं एवढेंच

यावर उपाय काय ?

## २१ श्रमचलन

विनोबाजी म्हणतात श्रमचलन सुरू करावे नाण्यावर रुपया, आणा, पैसा असे न लिहिता रोज, तास, मिनिटें असे लिहिलेले असावे एक गुंडी सूत कातायला दोन तास लागतात व त्या] सुतासाठी कापूस तयार करायला एक तास लागतो तर एका गुंडीची किंमत ' तीन तास ' होईल विणकराच्या एक वार खादीची किंमत त्याच हिशेबानें पधरासोळा तास होईल वस्तु बनविण्यासाठी सामान्यपणें जेवढे तास काम करावे लागत तेवढे तास ही त्या वस्तूची किंमत होईल अशाने न्हाव्याचा तास व वकिलाचा तास समान बनतील सर्व प्रकारच्या समाजमान्य श्रमाचे मूल्य समान होईल ऑफिसच्या वेळभर मन लावून काम करणाऱ्या चपराशापासून राज्यपालापर्यंत सर्वांना समान वेतन मिळेल व तेवढेंच

वेतन शेतांत राबणाऱ्या शेती – मजुराला व कारखान्यात काम करणाऱ्या मजुर – मुकादम – मॅनेजर, एंजिनीयर इत्यादीनाहि मिळेल.

परंतु हे लागू करतांना अनेक अडचणीहि उद्भवतील. वकिलाच्या किंवा सर्जनच्या एका तासाच्या श्रमाच्या पाठीमागें अनेक तासाची पूर्वतयारी छपलेली असते. कांहीं पूर्वतयारी तात्कालिक असते तर काही शिक्षणाच्या रूपानें अनेक वर्षे आगाऊ करून ठेवलेली असते. कोर्टात एक तास बोलण्यासाठी बॅरिस्टरला आगाऊ अनेक दिवसहि कागदपत्र वाचावे लागतात. त्यामुळें बॅरिस्टरचा एक तास म्हणजे खरोखरी पचवीस तासच समजणें वाजवी ठरतें. प्राथमिक शिक्षकाच्या शिकवणीचा तास व प्रोफेसरच्या व्याख्यानाचा तास यांच्या मूल्यांमध्येंसुद्धा तसाच फरक ठेवावा लागेल. ( अर्थात् अशी पूर्व तयारी हिशेबात धरूनहि प्रचलित विषमतेचे समर्थन होत नाही ) शिवाय या तास – नाण्याचाहि काळाबाजार होऊं शकेल. वकिलच अशीलाकडून नव्हे तर हमालसुद्धा गर्दीच्या प्रसगी पॅसेंजराकडून अर्ध्या तासाच्या कामाबद्दल चारदोन नोटा तासाच्या मागू व मिळवू शकेल.

## २२ सौदा व अडवणूक

कारण सौदा आला की त्यांत अडवणूक येतेच. बाजारभाव हा मागणी व पुरवठा यांवर अवलंबून रहातो. माणसाचे काय किंवा वस्तूचे काय, वाजवी दर कसे ठरवायचे ? आज एकादशी आहे, हजार लोकांचा उपास आहे, परतु केळी ८०० माणसापुरतीच आहेत. ती कोणत्या ८०० ना द्यावीत की साऱ्या हजाराना यथाप्रमाण वाटून द्यावी ? निश्चित मोजणी व वांटप कोण कसे करणार ? वस्तु खऱ्या गरजवताना मिळाव्या हे रास्त आहे पण खरी गरज कशावरून ठरवायची ? केळी तुला उपासासाठीं पाहिजेत कीं केवळ मजेस्तव पाहिजेत ते कशावरून ठरवायचें ? खरी गरजसुद्धा कमी अधिक निकडीची असूं शकते. तिची डिग्री कशी मोजायची ? यावर उपाय हाच की जो केळयांसाठी सर्वांत अधिक किंमत द्यायला तयार होईल त्याची गरज अधिक समजावी. अर्थात् लिलांव हीच विक्रीची व्यवहार्य व वाजवी पद्धति ठरते. आपले बाजारभाव असेच प्रत्यक्ष व तात्कालिक नाहीं

तरी अप्रत्यक्ष, आडवळणाच्या व सुदीर्घ लिलांवांनीच चढत, उतरत, 'ठरत' ( =स्थिरावत ) असतात. कधी विक्रेते लिलांवाने दर चढवित जातात तर कधीं ग्राहक "चौकशी" करीत उतरते लिलाव चालवितात पण उभयपक्षी लिलावानेच दर ठरतात.

माणसाचे दरसुद्धा असेच ओढाताणीनें ठरतात. मॅट्रिकला रु. ५० व बी ए. ला रु. १५० का ? अमुक वकिलाची फी हजार रुपये का ? तर त्या लायकीचा वकील कमीत मिळत नाही म्हणून. त्याच्या कामाचे मूल्य ठरविण्याचे कोणतेहि बुद्धिगम्य साधन आमचेपाशी नाही. तरीपण त्याच्या व त्याचेरा अशीलाच्या रहाणीतील फरक नजरेत भरतो व खुपतो, त्यावरून स्थूल दृष्टीनें त्याचे काम खरोखरच इतक्या मोलाचे आहे का? अशी शंका मनात उद्‌भवते. इतराना काय वाटते ते सोडून दिले तरी पापभीरू वकिलाचे मन त्याचे त्यालाहि खातें. "तू फी घेतोस ती समर्थनीय आहे का?" आणि मग बहुधा तो "इतर वकिलाच्या मानाने मी पुष्कळ बरा" असे म्हणून मनाचे समाधानहि करून घेतो. तथापि त्याला संपूर्ण समाधान व आत्मविश्वास लाभत नाही.

अशा तऱ्हेने हे दर — वस्तूचे व माणसाचे — अजमावणीने व ओढाताणीनेच ठरवावे लागतात सुव्यवस्थित समाजामध्यें अशा तऱ्हेने ठरलेले दर काही काळ गतानुगतिकत्वाने चालू रहातात, व अडचणी येतील, किंवा परिस्थिति बदले, तसतसे त्यात फेरफारहि करण्यात येतात हे सारे ढकलत चालते, न्यायनीतीच्या सिद्धातास अनुसरून नाही.

शिवाय एक मोठी अडचण अशी की जुन्या समाजाच्या जुन्या संदर्भात् हे दर नादले पण आता नव्या समाजाच्या नवसंदर्भांतहि ते तसेच चालवायचे का ? इंग्रजी राजवटींतील शिरस्ते स्वराज्यामध्यें तसेच चालता कामा नये. नवरचना प्रत्येक अंगोपांगाला लागू व्हावयास पाहिजे. त्याचा निश्चित व तत्त्वशुद्ध मार्ग कोणता ?

येथें आणखी अेक मुद्दा लक्ष्यांत घ्यावयास पाहिजे तो हा की आपल्याला मुख्यत. मानसिक समता पाहिजे आहे, स्थूल, गणिती समतेचा

आग्रह नाही. निरलस, निर्व्यसनी, मितव्ययी इसम अधिक सुखात नांदेल व व्यसनी, आळशी, उधळखोर इसम दारिद्र्यात राहील तर त्याची खत मानण्याचे कारण नाही. समता म्हणजे समान संधी. त्या संधीचा फायदा भिन्न प्रमाणात घेतल्याने उद्‌भवणारी गुणमूलक विषमता मानवी प्रगतीला उपकारकच होईल समता म्हणजे सबघोडे, बारा टक्के नव्हे. कोणी आवडीनुसार घरावर विशेष खर्च करील, कोणी जेवणखाणावर तर कोणी कपड्यालत्त्यावर. समतेला अशा विविधतेचे वावडे नाही. विविधता व विषमता यामध्ये फरक आहे. विविधता ही निसर्गप्रेरित व आनंददायी आहे, विषमता मनुष्यकृत व वैषम्यजनक असते. वय, प्रकृतिमान, विशेष गरजा, विशेष अधिकार इत्यादींस अनुसरून काही विषमता दिसली तरीहि हरकत नाही. एका कुटुंबामध्येसुद्धा मुले, म्हातारे, दुखणाईत, विशेष जोखमाची कामें करणारे इत्यादींनाच नव्हे तर हट्टी किंवा भाडखोर व्यक्तींनाहि खास सवलती मिळत असतात. परस्पर सलोखा व समानता नांदेल तोपर्यंत त्या खास सवलतीहि समतेत बसतात.

मात्र सध्या आपल्या समाजामध्यें या संतोष – सलोख्याची विशेषच वाण भासते, त्यामुळें प्रत्यक्ष स्थूल समतेचीसुद्धा विशेष आवश्यकता आहे. असो.

## २३ मानवतेचें अवमूल्यन

माणसाचे बाजारभाव विशेष लायकीच्या माणसाचे जसे भरमसाट वाढतात तसेच ते सामान्य सामकाम्या मजुरा – कारकुनाचे खूप घसरतातहि. परिणामी माणुसकीचे अवमूल्यन होते. आपण पहातोच की, २ बाया = १ मजूर ; ३ मजूर = १ मुकादम ; ३ मुकादम = १ ओव्हर-सीयर ; ३ ओव्हरसीयर = १ दुय्यम एजिनीयर , ३ दुय्यम एजिनीयर = १ मुख्य एजिनीयर अशी मानवाची कोष्टके व्यवहारात चालतात. वास्तविक एजिनीयराइतकीच मजुराचीसुद्धा आवश्यकता लागते. असे असता त्यांच्या वेतनामध्यें जमीन अस्मानाचा फरक पडतो हे उघडच शोषण आहे

## २४ स्वाभिमान व स्वातंत्र्य

पण त्यावर कोणताहि त्वरित इलाज आम्हाला सुचत नाही. लोकशिक्षणाचा व जनशक्तीचा धिम्मा मार्गच शक्य दिसतो मजुरांनी आपले श्रम मानी मोलाने विकण्याचे नाकारावे. समता स्थापन होण्यासाठी दलित वर्गामध्ये समतेची आकांक्षा व स्वाभिमानवृत्ति जागृत व्हावयास पाहिजेत. न्हाव्याने शिक्षकाला सांगितले पाहिजे की "मी तुमच्या मुलाचे केस कापतो तोपर्यंत तुम्ही माझ्या मुलाला गणित शिकवा माझा वेळ व माझें कौशल्य ही तुमचा वेळ व तुमचे कौशल्य याहून उतरतीं समजता नये नाहीपेक्षा तुम्हीच आपल्या मुलाचे केस कापा आणि मीच माझ्या मुलाला शिकविता येईल तसे वेवढें शिकवीन."

मुलीच्या बापाने मुलाच्या बापाला सांगितले पाहिजे की, "रु.५०० चे देज घेऊन मी कन्यादान करणार नाही. माझी मुलगी पैशावर विकायची नाहीं. माझ्या मुलीच्या मोबदल्यात मला तुमचा मुलगा द्या. तुमचा मुलगा, माझी मुलगी, हा लग्नाचा समान सौदा. नाहीपेक्षा पैशाच्या बळावर तुम्ही दहा मुलीसुद्धा खरेदी कराल, पण माझी मुलगी एवढी सवंग नाही."

जेथें समतेची व सहकार्याची वागणूक मिळेल तेथें दलितांनी आपल्या हातापायांना मुक्तपणे वावरू द्यावे. पण जेथें विषमतेची व शोषणाची शंका येईल तेथें त्यांनी दुसऱ्यासाठी राबण्याचे नाकारून स्वतःच्याच शेतात वा स्वतःच्याच उद्यमालयात दुप्पट तिप्पटहि राबावे अर्थात् त्यासाठी त्याचे स्वतःचे शेत व ग्रामोद्योगालय असावयास पाहिजे. भूदानाच्या आंदोलनाचा तोच कटाक्ष आहे.

उलटपक्षीं पुढारलेल्या वर्गाचेहि शिक्षण व हृदयपरिवर्तन व्हायला पाहिजे. अडाण्याच्या अडचणीचा गैरलाभ घेण्यापेक्षा त्यांचे शिक्षक व सहकारी बनण्यांतच भूषण आहे हें त्यांच्या लक्षांत आणून द्यावयास पाहिजे.

एवढेंच नव्हे तर ज्याला स्वतःचे स्वातंत्र व स्वाभिमान प्यारा आहे तो दुसऱ्याच्या स्वाभिमानालाहि तितकाच जपेल. एखादा भिकारी माझी उष्टी पत्रावळ चाटू पाहिल तर मी त्याला सक्त मनाई करीन. मी असा प्राण गेला तरी त्याची उष्टी पत्रावळ चाटणार नाही, तसाच मी त्याचा प्राण चालला तरीहि त्याला माझें उष्टें चाटू देणार नाही. स्वातंत्र, स्वाभिमान, मानवता या मूल्याचा हाच चमत्कार आहे कीं अन्य कोणाचाहि स्वाभिमान दुखावला तर त्याने माझा स्वतःचा स्वाभिमानहि दुखावतो. माझ्या भावाची लाचारी ती माझीच लाचारी आहे आणि मनुष्य मात्र माझा भाऊ आहे. बैलाने उष्टें खाल्ल्याचे, मळहि खाल्ल्याचे, मला दुःख नाही पण माणसाची लाचारी मला सहन होत नाही

इंग्लड–अमेरिकेमध्यें अवघ्या १००–१२५ वर्षांपूर्वी गुलामगिरी बंद करण्यात आली व गुलामाना, त्याची इच्छा असो व नसो, सोडून किंवा हाकलून देण्यात आले त्यात हीच दृष्टि होती. सारेच गुलाम *सुटकेला आतुर झाले होते असे नाही, काहींना गुलाम म्हणून निश्चिततेने* जगणेच प्रिय होते, तरीहि त्याच्यावर स्वातंत्र्याची सक्तीच करण्यात आली ते स्वतःच्या गुलामगिरीत संतुष्ट असले तरी इतर लोक त्याच्या गुलामगिरीत संतुष्ट नव्हते.

## २५ निःशूद्र पृथिवी

आणि त्याचसाठी आम्हालाहि आज सोंगकाम्ये आणि कामसांग्ये असा भेद ठेवायचा नाही आहे. पूर्वकाळी अडाणी, अविकसित मानववंश होते आणि परिणामीं गुलामगिरी, दामदासी इत्यादींची प्रथा होती. हिंदू समाजातील शूद्रवर्ण हाहि एकप्रकारे निर्बुद्ध, दुर्बल, परतंत्र व परावलंबी वर्ग आहे परंतु आपल्या नवसमाजामध्यें अशा वर्गाला स्थान नाही. म्हणजेच आता कोणी शूद्र रहातां कामा नये. ( येथें 'शूद्र' शब्द मूळ चातुर्वर्ण्य रचनाराना अभिप्रेत असलेल्या उदात्त अर्थाने वापरला नसून शूद्रांबद्दल जी सामान्य समजूत आढळते तिला अनुलक्षूनच वापरला आहे )

तथापि अलीकडे नवीनच एक पांढरपेशा शूद्र वर्ग वेगानें वाढत चालला आहे व सारा देश शूद्रमय बनणार की काय अशी धास्ती वाटू लागली आहे नोकरवृत्ति म्हणजे शूद्रवृत्तीच होय सरकारची नित्य वाढणारी नवीननवी खाती, व प्रत्येक खात्याचा वाढता नोकरवर्ग व त्याना मिळणार नियमित वेतन व पेन्शन यामुळें सर्वांनाच सरकारी नोकरी म्हणजे आयुष्याचा विमा वाटतो व एका रिकाम्या जागेसाठी शेकडो अर्जदार तिष्ठत असतात त्याखेरीज ग्रामीण उद्योगाची जागा कद्रित, सघटित, यान्त्रिक उद्योगानी घेतल्यामुळें खेड्यातील स्वतन्त्रवृत्तीचा कारागीरवर्गहि आपले बुडत धंदे सोडून कारखान्यात मजूर म्हणून रहातो वहातूक व प्रवास वाढत आहेत तसतशा मोटारी, आगगाड्या व विमाने मोठमोठ्या कंपन्याकडून किंवा सरकारकडून चालविण्यात येत आहेत व त्यामध्यें लक्षावधी नोकराचा भरणा होत आहे व्यापारहि तसाच अवाढव्य प्रमाणात चालतो आणि त्यामध्येंहि "गुमास्ता" वर्ग मोठ्या सख्येने गुततो शेतीचा विकास होऊ लागला व शेतीमध्यें यान्त्रिक शक्तीचा वापर सुरू झाला तसतशी शेतीसुद्धा मोठ्या प्रमाणात मजुरा– मुकादमा मिशी केली जाते साखर कारखाने हे अलीकडे वडे शेतकरी बनलेत आणि दूरदूरचे शेतकरीसुद्धा त्याच्या मळ्यात मजूर म्हणून काम करण्यासाठीं गोळा होतात ही सारी • वाढ नदीच्या पुराप्रमाणे अवचित झाली असून त्या पुरामध्यें स्वतन्त्र पेशाचे ब्राह्मण – क्षत्रिय – वैश्यहि वाहून गेलेत व डि – ग्रेड ( ग्रेड कमी ) होऊन नोकर म्हणजे शूद्र बनतेत पूर्वी मजूर तोच मालक असे परतु अलीकडे बहुतेकजण नोकर व काही थोडे मालक अशी दुफळी पडली आहे पूर्वी जे स्वयनियुक्त उत्पादक होते ते आता कारखान्यातील यंत्राचे भाग बनले आहेत शिक्षणाचा जसजसा प्रसार होतो तसतशी ही नोकरी – निष्ठाहि पसरत आहे यात समाजस्वास्थ्याचा बिघाड तर आहेच पण मानवतेचाहि ऱ्हास आहे पूर्वीची पृथक् स्वतन्त्रता नष्ट झाली पण तिच्या जागी साघिक स्वतनता आली नाही एकेकट्यानें स्वतन्त्रपणे करावयाच्या धद्याऐवजी मोठमोठ्या सख्येनिशी चालणारे उद्योग येतात तसतशी स्वतन्त्रताहि साघिक बनावयास पाहिजे, म्हणजे सघटित उद्योग सहकार्यानें चालावयास पाहिजेत परतु कुवन कमी व

परस्पराबद्दल अविश्वास यामुळें कारागीर व शेतकरी भांडवलदाराचे मजूर होऊन रहाणेच पसत करतात भारतामध्यें पूर्वी अगणित प्रादेशिक राज्यें होती. आता अखिल भारताचे एक सघराज्य बनले आहे, परतु ते बनण्यापूर्वी या साऱ्या राज्याना ब्रिटिश आधिपत्याच्या चरकातून जावे लागले, तशी अवस्था आज उद्योगाची झाली आहे. आम्ही जसे ब्रिटिशाचे आधिपत्य पत्करूनहि पुन्हा मनातून त्याना शिव्याशापच देत असू तसेच हे मजूरसुद्धा प्रथम नोकरी मिळण्यासाठी आर्जवे करतात व ती मिळाल्यानतर मालकाविरुद्ध धुसफूस करीत रहातात हा त्याचा दोष नसून मालक – मजूर या नात्याचाच तो दोष आहे ब्रिटिश व हिंदी यामधील शास्ते – शासित सबध हा जसा अनुचित सबध होता तसाच हा मालक – मजूर सबध अनुचित आहे व त्यातून परस्पर अविश्वास व तिरस्कार, पिळणूक, कामात कसूर, सप व वर्गविग्रह इत्यादि अनर्थपरपराच उद्भवणार हा मूळ दोषच दूर व्हायला पाहिजे अर्थात् कामगार स्वयनियुक्त व आत्मनिर्भर बनला पाहिजे केंद्रित उद्योगाच्या या काळात त्याचा तो स्वयम् एकुलता न रहाता सामुदायिक बनला पाहिजे. समुदाय स्वयनियुक्त होणे म्हणजे त्याने सहकार्याने काम करणे कामगारानी कारखान्यात, मळयात किंवा दुकानात एकत्र जमायचे ते समतेच्या, सहकार्याच्या व सयुक्त जबाबदारीच्या नात्याने जमावे हाच खरा मार्ग आहे मॅनेजर, एंजिनीअर, कारकून, मुकादम हेहि कामगारच आहेत त्यानीहि हे सहकार्याचे नाते मान्य करावयास पाहिजे सामान्य कामगारापेक्षा त्याना मेहनताना अधिक मिळावा न मिळावा, किती मिळावा ते परस्पर विचाराने ठरविण्यात यावे.

हे सर्व घेण्यासाठी वरिष्ठ वर्गामध्यें नम्रता यावयास पाहिजे व कनिष्ठ वर्गाचीहि ऐपत, म्हणजे बुद्धि व योजनाशक्ति तसेच दानत, म्हणजे जबाबदारीची जाणीव, ही वाढली पाहिजेत त्यात उभयपक्षाना काही कष्ट पडतील पण कष्टाखेरीज वाढ नाही.

## २६ भांडवलदारहि दयापात्रच

सध्याच्या दुफळीमध्यें आपली सहानुभूति सहाजिकच कनिष्ट

अशा तऱ्हेने एकत्र येणें म्हणजेच समाज बनविणें. घोळका निराळा, समाज निराळा. आगगाडीच्या डब्यांतील गर्दी हा समाज नव्हे. तेथें तर प्रत्येकाची इतर सर्वांशी व्यक्ताव्यक्त स्पर्धाच चालू असते.

सध्यां आपला जो ' समाज ' म्हणून आहे तो असाच आगगाडीतील गर्दीच्या स्वरूपाचा म्हणजे स्पर्धाकुल आहे. दुसऱ्याचें संकट ती माझी संधि हेंच त्याचें सूत्र आहे. कारण जमिनीची मालकी म्हणजे अन्य साऱ्या ग्रामस्थाची ठवणूकच आहे. व्याज, भाडें, खंड ही सारी एकमेकाना अडचणीत पकडूनच आपण मिळवीत असतो मालक – मजुराची कुस्ती तर सार्वत्रिकच आहे. या स्पर्धेची जागा सेवा व आत्मार्पण यानी घ्यावयास पाहिजे. तुझें संकट ते माझेंहि संकट, माझी संधि ती तुझीहि.

यांत व्यवहार व तारतम्य भले सभाळा, " जशास तसे " हि खुशाल करा पण आपला कल किंवा तोल देण्याकडे असावा, घेण्याकडे नव्हे.

हेच खरे मानवजीवन. याहून भिन्न ते पशुजीवन. हीच विश्वशातीची गुरुकिल्ली. शाति साधली की तुष्टि आणि पुष्टि आपसूकच साधतील.

## २८ ग्रामदान व अर्थ – शुचिता

आपल्याला जी अर्थशुचिता, व शोषणमुक्त समाजव्यवस्था साधावयाची आहे ती ग्रामदानाने पुष्कळ अशी साधते.

ग्रामदानामध्यें कोणी जमिनीवर मालकी सांगत नाही त्यामुळें शोषणाचे मुख्य मूळच नष्ट होते. इतर आर्थिक व्यवहारहि शोषणमुक्त असतील. ग्रामदान म्हणजे सर्वोदय समाजाचे आटोपशीर क्षेत्र. तेथें कोणी कोणाचे प्रत्यक्ष शोषण तर करणारच नाही पण ज्याला आपण मागें अप्रत्यक्ष ( नेमके दाखविता न येणारे ) शोषण म्हटले तेहि नसेल. अर्थात् विशिष्ट दर्जाची उद्योगिता, निर्व्यसनता, व मितव्यय इत्यादीचे पालन करणाऱ्या भिन्न पेशाच्या व जातिधर्माच्या ग्रामस्थाचे जीवनमान व परिणामी सस्कृतिमान, समान असेल. कांही असमानता राहिली तरी ती तिला सर्वांची समति आहे म्हणूनच राहील. ब्राह्मण आणि महार, मराठा आणि माग, तेली आणि शिपी, कोष्टी आणि कुभार इत्यादीचे

निरनिराळे उद्योग चालतील पण त्या सर्वांच्या रहाणीमध्यें विविधता असली तरी विषमता नसेल. एक दुभते खाईल तर दुसरा मासळी खाईल, एक एकादशीचा उपास करील तर दुसरा शिवरात्रीचा, पण एकाचे घरी अन्न वाया जाते आणि दुसऱ्याचे घरी चूलहि पेटत नाही असे होणार नाही एक धोतर नेशील तर दुसरा पाटलोण नेशील, पण एका घरची जुन्नेरे दुसऱ्या घरच्या लोकानी वापरायची असे होणार नाही एकमेक एकमेकाचे घरी कामात मदत करण्यास जातील पण ते जाणें एकतर्फी रहाणार नाहीं तर पारस्परिक असेल, त्यात मालक–मजूर किंवा श्रेष्ठ–कनिष्ठ नाते न रहाता शेजारसबधाचेच नाते राहील. गावात कोणी गडी नसतील, सारेच सवगडी असतील.

पूर्वकाळीहि गावात सघटना होती, परस्परावद्दल जिव्हाळा व शेजारसबध होते, सतोष व सलोखा नादत होता पण या सर्वामध्यें विषमता होती कारण तो राजेशाहीचा काळ होता, भू–पतींचा जमाना होता. आता राजेशाही जाऊन लोकशाही व लोकनीति उदयास आली आहे आता ग्रामरचना लोकनीतीस अनुसरून बनविली तरच ती मानवेल व टिकेल. या लोकनीतीचा पाया जमिनीचे तत्त्वतः विश्वार्पण व व्यवहारतः ग्रामार्पण हा असेल.

शेतकरी हा त्या ग्रामसमाजाचा मानदड ( मापाची काठी ) राहील, व इतर कारू–नारूचे जीवनमान शेतकऱ्याच्या बरोबरीचे राहील. मडक्याचे, चपलांचे, सुता–रवळयाचे, शिंजाई–विणाईचे इत्यादि दर गावच्या निरखाने ठरविलेले असतील. ते धान्यात असतील किंवा रोखीचेहि असतील व ते कसे काय नादतात ते पाहून त्यात दुरुस्ती करण्यात येईल. " नादतात " याचा अर्थ असा की त्या दरानीं त्या कामगाराला सामान्य काम करून गावच्या सामान्य जीवनमानाने जगता यावे. गावचाच एकादा हुशारसा इसम शिक्षण घेऊन वैद्यकी करील वैद्याला सहजीच विशेष मान मिळेल. गावचीच काही विद्वान मडळी शाळा चालवितील. " विद्वान् सर्वत्र पूज्यते " या न्यायाने त्याच्यावद्दलहि ग्रामस्थामध्यें विशेष आदरभाव राहील पण त्याचे अन्न, वस्त्र, घर इतराहून भिन्न नसेल.

त्याचप्रमाणे सुतारकामात, लोहारकामात, चित्रकलेत, एवढेंच काय पण झाडावर चढण्यात, पोहण्यात, खोल पाण्यात बुडण्यात विशेष नैपुण्य दाखविणाराचा गावात विशेष मान राहील. प्रसंगी त्याना एकादी ढाल किंवा शाल बक्षिसहि देण्यात येईल, पण रोकड अधिक मिळण्याची आशा नाही; त्याची अपेक्षाहि नसेल.

इत्यादि विविध पेशाच्या लोकाची आवश्यकता असे. अशा लोकाना विनवून, सगाती घेऊन, परस्पराच्या आधारानेच नवीन गाव वसविले गेले, आणि परस्पराच्या सहकार्यानेच आजवर पिढ्यान् पिढ्या नादत आले आहेत. कोकणचे गाव हे नैसर्गिक किल्ले असतात तर देशावरील गावाना मुद्दाम तट बाधून व वेशी ठेवून त्याचे कोट बनविलेले असतात.

अशा तऱ्हेने प्रत्येक गाव हा एक किल्ला किंवा आश्रम, किंवा एक विशाल कुटुबच आहे. आजवर हे किल्ले एकेकट्या किल्लेदाराच्या – पाटील, खोत, देशमुख इत्यादीच्या – हुकमतीखाली नांदले. आता त्याच सघटनेचे समताप्रधान नवसस्करण करावयास पाहिजे.

## २९ ग्रामसंकल्प

समता पाहिजे तशीच पूर्वी गावांना लूटारू – दरोडेखोराच्या निवारणासाठी दगडी तटबदी असे तशी आता आधुनिक औद्योगिक व व्यापारी परचक्राच्या निवारणासाठी आर्थिक तटबदीहि पाहिजे, तरच या खेड्याचा टिकाव लागेल अलीकडे दळणवळणाची साधने सुलभ व जलद झाली, तसेच यत्रशक्तीने विविध उत्पादनहि विपुल व स्वस्त होऊ लागले आहे. केंद्रित यत्रोद्योगाच्या स्पर्धेपुढे ग्रामीण उद्योग एकामागून एक झरझर नष्ट झाले. गावात शेती एवढाच एकमात्र उद्योग उरला. पण एकटी शेती तग धरू शकत नाही. जसा मनुष्य एका पायावर फार वेळ उभा राहू शकत नाही. तिला ग्रामोद्योगांची जोड पाहिजेच. ग्रामोद्योग नष्ट झाले तर शेतीहि लटपटेल व खेडी ओस पडतील. म्हणून कारखान्याच्या व जागतिक व्यापाराच्या परचक्राचे निवारण करण्याकरता खेड्यानी मजबूत आर्थिक तटबदी करावयास पाहिजे. या तटबदीलाच विनोबानी 'ग्रामसकल्प' असे नाव दिले आहे. ग्रामसकल्प म्हणजे ग्रामस्थानी एक विचाराने ठरवायचे की आपल्याला लागणारे कापड, किंवा सावण, कागद, तेल, आगकाड्या, साखर इत्यादि आम्ही आपले तयार करून वापरू. गावच्या तेली, कुंभार, शिंपी, विणकर

इत्यादींना अव्हेरून बाहेरचा माल कितीहि सुबक व स्वस्त मिळाला तरी तो घेणार नाही गावाचे आयोजन गावच करील

तेली, कोष्टी, शिपी कुंभार, चाभार, शेतकरी इत्यादि समस्त ग्रामस्थानी एकमेकांचे उद्योग चालविण्याचे ठरविले तर गावच्या संपत्तीची धूप थांबेल, ती गावच्या गावात खेळेल व मुरेल अर्थात खादी – ग्रामोद्योगाच्या वस्तुच ग्रामस्थाना लाभकारक होतील, स्वस्त पडतील, किंबहुना फुकटात मिळाल्यासारखें होईल, कारण शेतीतून उरणाऱ्या वेळात गावच्या लोकांनी गावच्या साधनातून, एरवी वाया जाणाऱ्या शक्तीतून, त्या बनविलेल्या असतील गाव म्हणजे मोठें कुटुंबच कुटुंबामध्यें दुजाभाव कल्पिला की मग नवऱ्याला बायको महाग पडतो, मिळवित्या बायकांना नवरासुद्धा महाग पडतो आणि नोकरपेशा जोडप्याला मुले परवडत नाहीं त्यापेक्षा संततिनियमन स्वस्त पडते उघडच आहे, अन्नापेक्षा विष व जीवनापेक्षा मरण केव्हांहि स्वस्तच पडणार हे सांगायलाच नको ! ग्रामोद्योगामुळें गावात जीवन वाढते जेथें झोपा, जांभया व सामसूम असायच तेथ पिंजणीचा वीणा, चरख्याचा बाजा, मागाची खाटखूट व तेलघाणीचा कू कू नाद घुमू लागतो

ग्रामसंकल्प म्हणजे ग्रामस्वदेशी स्वदेशी म्हणजे केवळ देशी मालच नव्हे तर स्वदेशी म्हणजे स्वकीयाबद्दल जिव्हाळा बापाला बाबा व मावशीला मावशी म्हणणे, स्वतःच्या गावढळ आप्तेष्टाची लाज न मानतां अभिमान मानणें, माझा देश जसा मला प्यारा, त्याच्या दसपट प्यारा मला माझा गाव आईला जसा आपला काळा, कृश, खोडकर मुलगाच प्रिय, तसा मला माझा गावढा, दुष्प्राप्य, ओबडधोबड, अशिक्षित, अडाणी, तिढा गांवही प्रिय मी त्या गावावरून ओळखला जाऊ इच्छितों आम्हीं स्वतःची ओळख पटवर्धन, राणे इत्यादि घराण्याच्या नावानें देतो काहीजण भट, सुतार, तेली अशा जातिवाचक नावानीं ओळखले जातात परंतु आमचे कानडी शेजारी मात्र स्वतःची ओळख चिकेरूर, मुद्देबिहाळ इत्यादि आपापल्या गांवावरून करून देतात तिकडील पटवर्धन,

राणे, तेली, शिंपी, चाभार सारेच " मुर्देविहाळ " ! ही खरी स्वदेशी. गावकऱ्याचे सारे गुणावगुण समजूनहि त्याच्याबद्दल आत्मीयता बाळगणे, गुणसवर्धन व अवगुणनिरसन करण्याचा प्रयत्न करणे, याचेंच नाव ग्रामनिष्ठा गावाच्या सत्तेहून श्रेष्ठ बाहेरची सत्ता न मानणे म्हणजेच ग्रामशरणता. अशी ग्रामशरणता हाच ग्रामस्वराज्याचा मूलाधार.

## ३० उदकशांत

जमिनीची मालकी व तिचे निरंतरचे खड याचे निरसन, व्याज, भाडें इत्यादीचे नियंत्रण, ग्रामदान व ग्रामसंकल्प, कारखान्याचे सहकारी संचालन इत्यादि अमलात आल्याने शोषणाचे मुख्य दरवाजे सारे बंद होतील आणि मग प्रासंगिक करारांच्या व देवघेवीच्या कांही खिडक्या किंवा फटी रहातील त्याहि लोकशिक्षणानें हळूहळू मिटत जातील. अशाने समाजातील वितुष्टाची कारणे दूर होऊन परस्पर स्नेह व सलोखा नांदेल व त्यातून मग मनुष्याचा गुणविकास व सुखसमृद्धि हीहि साधतील म्हणजेंच अहिंसक समाजाची स्थापना होईल; गावाचे गोकुळ होईल, पृथ्वीचा स्वर्ग बनेल.

*पण आजवर आपण जें एकमेकाचे शोषण केले, एकमेकाच्या अडचणीचा जो गैरफायदा घेत आलो, त्याच्या कडवट आठवणी कशा बुजाव्या? त्या शोषणातून उद्भवलेली विषमता व विषमतेतून उद्भवणारे वैमनस्य ही कशीं शमावी?*

*त्यासाठी आपण सर्वांनीच, श्रीमंतानीं व गरिबांनीं, सामुदायिक प्रायश्चित्त करावयास पाहिजे. आपण सारेच त्या पापाचे समान धनी आहो दोष व्यक्तीचा नव्हता, तर त्या पद्धतीचा होता, आणि त्या पद्धती आम्हीतुम्ही सर्वांनीच मान्य केल्या व चालविल्या होत्या. आता आपण सर्वांनीच जशा त्या दुष्ट प्रथा सोडून द्यावयाच्या आहेत तसेच पूर्वदोषाबद्दल आपण सर्वांनीच प्रायश्चित्तहि करायचे आहे.*

आज आपले सर्वांचेच धन — श्रीमंताचे मोठें व गरिबाचे छोटें — दूषित धन आहे. भ्रष्टाचार सार्वत्रिक झालेला आहे. आपण सारेच त्या भ्रष्टाचाराला कारणीभूत आहो, म्हणून कोणी कुणाला दोष देऊं नये हेच योग्य.

पूर्वी सोहेर — सुतक फेडतेवेळी सारे घर व त्यातील सारीच चीजवस्त विटाळलेली आहे या शकेने त्या विटाळाच्या निरसनार्थ "उदकशात" करण्याची वहिवाट असे तशीच आपण एक उदकशात करू या.

या शातीमध्यें सर्वांनी यथाशक्ति दान करावे भूमिवानानी अबाधित मालकी साऱ्याच जमिनीची सोडायची आहे, पण त्याखेरीजहि जमिनीची कष्टार्जित मालकी व तीतून मिळावयाचे तात्पुरते खंड त्याना मिळावयाचे आहेत त्याचेहि शक्य तेवढें दान गरीबाना करून टाकावे. सावकाराचे व्याज अज्जीच बंद होईल पण त्याखेरीज त्यानी मुद्दलाचीहि काही सूट गरीव ऋणकोना द्यावी. कोणी धनधान्याचे, कोणी गुराचे, कोणी कापडाचे, कोणी भाडयाचे, कोणी टेबल — खुर्च्यांचे, कोणी रोकड पैशाचे अशा तऱ्हेने प्रत्येकाने कांहीं ना काही दान करावे. कोणी श्रमदानहि करावे मजुरानीहि कधी वाजवीहून अधिक मजुरी घेतली नसेल किंवा त्याना मिळाली नसेल असे नाही. सक्रातीच्या दिवशीं सुवासिनी ज्याप्रमाणे कोणती तरी वस्तु 'लुटवितात' त्याचप्रमाणे आपल्यालाही जी सम्यक् क्रांति म्हणजेच सक्राति साधायची आहे तीमध्यें प्रत्येकाने आपापले सर्वस्व नसले तरी शक्य तेवढें स्वत्व लुटवावे.

आणि अशा तऱ्हेने जो जेवढें दान देईल, वा न देईल, तें सर्वांनी गोड मानून घ्यावे आणि झाले गेलें विसरून जाऊन येथून पुढें कोणी आगळीक करणार नाही आणि परस्पराशी प्रेमाने वागतील असे करावे शंकराचार्यांनी दानाची व्याख्याच 'दान यथाशक्ति सविभाग, अशी केली आहे ती यथायोग्यच आहे यथाशक्ति म्हणजे ज्याच्याबद्दल मागाहून पश्चात्ताप वाटणार नाहीं व मनाची प्रसन्नता ढळणार नाही असे.

कोणी म्हणतील सर्वांनी सर्वंच द्यावे व त्याची समविभागणीच करण्यात यावी पण ती सक्ती होईल आणि आजवर जे श्रीमतीला सरावलेले होते, ज्याना आम्हीतुम्हीच तसे राहू दिले, त्याना एकाएकी खाली ओढणे अन्यायाचे होईल त्याना नवीन परिस्थितीशी जुळवून घेण्याची सवड द्यावयास पाहिजे त्याचेपाशी कितीहि संपत्ति शिल्लक राहिली तरी यापुढें ती निरुपद्रवी संपत्ति आहे. त्या संपत्तीच्या बळावर ते इतरांची कमाई शोषून घेऊ शकणार नाही शिवाय ती कालवशात् घटतहि जावयाची आहे. मग निर्विष व मृत्युपथाला लागलेल्या सर्पाला बडविण्यात पुरुषार्थ कोणता ?

# III सर्वसामान्य

## १ योजनेचा चांगुलपणा

येथवर आम्ही माडलेली शोषणनिरसनाची योजना ही अनेक प्रकारे चागली आहे ती नेमस्त व सौम्य आहे, धोपट व सुटसुटीत आहे, तर्कशुद्ध व सुसगत आहे, विचारप्रधान व विकाररहित आहे, प्रेममूलक व पारिपत्यरहित आहे, समतोल व समन्वयी आहे

## २ नेमस्त व सौम्य

ही योजना सौम्य व नेमस्त आहे हिच्यामध्यें स्वामि वाचे निराकरण आहे, अवाधित, निरकुश मालकीला वदी आहे परतु तात्पुरत्या विनाशी मालमत्तेला मुभा ठेवलेली आहे ज्याच्या त्याच्या बचतीवर ज्याचा त्याचा पूर्ण अखत्यार रहाणार आहे येथें मालकीला स्थानवद्ध करण्यात आले आहे पण तिला वेडया घालून फासावर लटकावण्याचा इरादा नाही त्यामुळें कोणालाहि घवराट वाटण्याचे कारण नाही

"ईशावास्यमिद सर्वम्" हे खरे आहे 'सव सपति रघुपति की आही" हें त्रिवार सत्य आहे सपत्ति ही सामाजिक निर्मिति आहे तिच्यावर एकटयादुकटयाने स्वत ची मालकी सागणे असत्य व हास्यास्पद आहे हे उघड आहे तथापि या मूलभूत सत्याची आपल्या भेदग्रस्त दैनदिन जीवनात अमलवजावणी करताना 'माझें' व 'तुझें' हे भेदहि करावेच लागतात मी आणि तू आहो तोपर्यंत माझें व तुझें मानणे प्राप्तच आहे एकातिक साम्यवाद किंवा साम्ययोग व्यवहारांत उतरू शकत नाही काही तडजोडी कराव्याच लागतात, विशिष्ट मर्यादेपर्यंत खासगी मत्तेला वाव ठेवावाच लागतो उदा० कुटुवामध्येंसुद्धा धान्याचा साठा व शिजलेला स्वयपाक हे समाईक्च असतात तथापि पाने माडलीं, व आपण जेवायला बसलो म्हणजे एक भाऊ आपल्या भाकरीवरील लोणी प्रथमच खाऊन सपवील तर दुसरा तें शेवटच्या काही घासावरोवर खायला मिळावे म्हणून राखून ठेवील तसे राखून ठेवणाराला ते मागाहून

खायला मिळावे, ज्या भावाने स्वत चे लोणी चटकन् संपविले त्याला दुसऱ्याच्या पानातील शिल्लक लोण्याचा अपहार करायला मिळू नये हे न्यायोचित आहे स्वयपाक घरातील अन्न ही समाईक मिळकत असली तरी पानात वाढलेले अन्न ही खासगी मिळकत आहे व तीतील बचतीवर, जेवण आटपेपर्यंत, खासगी मालकी रहाणे हेच सोयीचे व न्यायाचे आहे साम्यवादाच्या कोणत्याहि योजनेला असे काही निर्बंध, व त्याचेच बरोबर काही सवलती, ठेवाव्याच लागतात हे निर्बंध व सवलती समाज धारणेला व मानवी गुणसवर्धनाला पोषक होतील व मारक होणार नाहीत अशा बेताने ठरवावे लागतात त्या ठरवितांना आपल्या समाजातील व्यक्तीची सर्वसाधारण मन स्थिति लक्ष्यात घ्यावी लागते.

खासगी मत्तेला समूळ बदी केल्यास म्हणजे व्यक्तीने काही बचत केली तरी त्याचा तिच्यावर अधिकार न रहाता ती समाजजमा व्हावी असे ठरविल्यास, मनुष्य आळशी व उधळखोर बनेल. "मी ज्यास्त काम केले तर त्याचा मला स्वत ला काहीच उपयोग होणार नाही, आणि मुळीच न केले तरी इतराच्या श्रमाचे फळ मला आयते मिळणारच आहे" असे विचार आजच्या सर्वसामान्य माणसाच्या मनात आल्याखेरीज रहाणार नाहींत

म्हणून आम्ही निर्बंध शोषणबंदीपुरतेच ठेविले आहेत व बचतीला मुभा ठेविली आहे. याचा अर्थ माणसाने स्वत.ची बचत इतराच्या कामी लावू नये असा मुळीच नाहीं. त्याने तसे अवश्य करावे पण तो निर्बंध नव्हे, अनुनय राहील. अनुनय याचा शब्दार्थ स्वत च्या मागून नेणे, आधी केले मग सागितले, अनु = मागून, + नी = नेणे, असाच आहे

## ३ अपरिग्रहाची श्रेष्ठता

अपरिग्रह, स्वात्मार्पण, ही श्रेष्ठ सपत्तिच आहे माणस नें स्वयप्रेरणेनेच आपले सर्वस्व जनताजनार्दनाला अर्पण करून ती श्रेष्ठ सपत्ति जोडावी. कारण जीवास जीव देणाऱ्या आप्तेष्टाहून थोर सपत्ति आणखी कोणती आहे ? सग्रह म्हणजे शेजाऱ्याची किंवा समाजाची ठकवणूक, अर्थात् समाजद्रोह. जो भाऊ स्वत चे म्हणून निराळे लाडू डब्यात भरून

त्याचे मूळ किमती पलीकडे भाडें मिळणार नाही एवढयान शोषण-निवारणाचा हेतु सफल होतो

## ६ तर्कशुद्ध व सुसंगत

आमची योजना तर्कशुद्ध आहे तिने व्यक्ति – स्वातंत्र्याला बाध न येता न्याय व समाजहित साधता येतात आमचा कोणताहि सिद्धांत कोणी अमान्य करू शकत नाही शिवाय सरजामशाही (जमीनदारी) व भाडवलशाही, खेडी व शहरे, ग्रामोद्योग व कारखाने इत्यादींना एकच धोरण लागू केलेले आहे कोणताहि नियम वा सिद्धांत सर्वत्र लागू केल्याने त्याचा जाचकपणा एकदम हलका होतो केवळ जमीनदारीविरुद्ध किंवा केवळ भाडवलदारीविरुद्ध गिल्ला केल्यानें त्या त्या वर्गाला तो जुलूमसा वाटतो पण दोहोंच्या नेमस्त नियंत्रणाची एकच शास्त्रशुद्ध योजना येथें माडलेली असल्याने कोणालाहि पक्षपात किंवा जुलूम वाटण्याचे कारण नाही

## ७ फॅक्टरीदान

योजना सर्वंकष होण्याच्या दृष्टीने ग्रामदानाप्रमाणेच 'फॅक्टरी दान' व्हावयास पाहिजे त्या दृष्टीनें आमची योजना परिपूर्ण नसली तरी तिनें फॅक्टरी – दानाचा मार्ग खुला होतो. फॅक्टरीवर भाडवलदाराचा हक्क भाडवलाच्या परत फेडीपुरताच राहील फॅक्टरीचे लहानथोर कामगार सामुदायिकरीत्या फॅक्टरीचे मालक बनतील त्याना स्वातंत्र्यप्राप्ति होईल, पण अतर्गत समता किंवा लोकशाही घडावयाची राहील फॅक्टरीच्या कमाईची वाटणी सव लहानथोर कामगाराच्या समतेने घडली कीं फॅक्टरीदान पूर्ण झाले

## ८ विचारप्रधान, विकाररहित

आमची योजना विशिष्ट न्याय्य व हितकर सिद्धांतावर आधारलेली आहे ती विशिष्ट व्यक्तीला किंवा वर्गाला साधक किंवा बाधक व्हावी अशी दृष्टि नाही कोणाची यात कड घेतलेली नाहीं किंवा कोणावद्दल

द्वेषादावा नाही. यात मानवसमाजाच्या कल्याणाची किंवा उन्नतीची दृष्टि आहे, कोणाचेहि पारिपत्य करण्याचा हेतु नाही आम्ही गावच्या नदीवर पूल बांधू इच्छितो त्यात जशी सर्वांचीच सोय करण्याचा हेतु असतो, त्या नदीत नावा चालविणाऱ्या नावाड्याचे पारिपत्य करण्याचा हेतु नसतो, त्याचप्रमाणे येथें 'बहुजन हिताय, बहुजन सुखाय' च प्रयत्न नसून सर्वहित, सर्वसुख साधण्याचाच प्रयत्न आहे पूल बांधल्याने जशी नावाड्यावर बेकारी ओढवते किंवा दारुबंदीमुळें तो धंदा करणाराची अडचण होते तशी या सुधारणेपायीसुद्धा काहींची तात्पुरती अडचण होईल. हे आम्हाला कळते परंतु आमचा हेतु त्याना अडचणीत घालण्याचा नाही. त्याच्या तात्पुरत्या अडचणींतून मार्ग काढण्यास इतरानीहि त्याना मदत करावयाची आहे. सर्वांबद्दलच्या सद्भावातूनच आमची ही योजना निघाली आहे व म्हणूनच तिचे सर्वांकडून स्वागतच होईल असा आम्हाला विश्वास वाटतो आमची क्रांति नाही भूमिवानाची, नाही भूमिहीनांची; नाही मालकाची, नाही मजुराची; ती सर्वांनीच मिळून "स्वांत:सुखाय" करावयाची सर्वोदयी क्रांति आहे.

## ९ समतोल व समन्वयो.

या योजनेमध्यें जे 'नाहीरे' आहेत त्याना उद्योग व मितव्यय याचे आश्रयानें उत्कर्ष साधण्याचा मार्ग मोकळा करून दिलेला आहे, त्याचे मार्गातील अडचणी दूर केलेल्या आहेत, तसेच 'आहेऱ्यां' च्या न्याय्य हितसंरक्षणाचेहि पूर्ण रक्षण आहे यांत कायदा व लोकशिक्षण, निर्बंध व मतपरिवर्तन यांना त्यांचीं त्यांचीं क्षेत्रें विभागून दिलेलीं आहेत.

हाडेंसुद्धा मुळान रचनातूनच बनतात तसेच कायदे हे बहुताच्या स्वयप्रेरणे-तूनच बनावयास पाहिजेत. रुधिराभिसरण म्हणजे प्रेमाभिसरण होय. प्रेमाच्या रुधिराभिसरणातून हाडाचा मजबूत सापळाहि बनावयास पाहिजे हाडाचा सापळा जसा मासरक्ताच्या कार्याला आधारभूत होतो तसेच हे निर्बंध प्रेमाच्या स्वयस्फूर्त व्यापाराला पोषकच नव्हे तर आधारभूत होतील. हे निर्बंध म्हणजे मनुष्याच्या समाजनिष्ठेचेच समाजीकरण आहे, तसेच समाजदेहातील सभाव्य विकृतीचे निराकरणहि आहे

## १० ट्रस्टीशिपचा सिद्धांत

शोषणनिरसनाच्या या योजनेचा गाधीजींच्या ट्रस्टीशिपच्या सिद्धाताशी मुळीच अडथळा येत नाही. ट्रस्टीशिपचा सिद्धात हा हाती आलेल्या किंवा असलेल्या धनाबाबत धनिकाची दृष्टि व भावना कोणती असावी व त्या धनाचा त्याने विनियोग कसा करावा ते सागतो. आमची योजना धनार्जन करताना पाळावयाची पथ्ये दाखवून देते. या दोन्ही सिद्धाताचा समन्वय असा होतो की जो स्वत ला ट्रस्टी समजतो तो आपली कमाई शोषणाच्या मार्गानी कदापि करणार नाही. शोषणमुक्त मार्गांनी जी कमाई होईल व पूर्वापारची जी सपत्ति त्याचेपाशी असेल तिचाच तो ट्रस्टी होईल सरजामशाही व भाडवलशाही यावर धन कमावून त्याचा 'ट्रस्टी' बनणे ट्रस्टीशिपचे विडबन होय

## ११ शांतिसेनेला आवश्यक

ग्रामदानातून उद्भवणारी जबाबदारी म्हणून विनोबाजींनी जी शातिसेनेची योजना हाती घेतली आहे त्या योजनेला ही आमची योजना पोषकच नव्हे तर आवश्यकहि आहे समाजात शाति नादवायची असेल तर प्रथम सघर्षाची मूळें स्वत चे व समाजाचे आचारातून खणून काढावयास पाहिजेत त्या खेणणीची तरतूद आमच्या योजनेने होते.

## १२ योजनेची अंमलबजावणी

आमची ही योजना सरकारने किंवा गावागावानी आपापल्यापुरती लागू करण्याचे ठरविले तर काय काय करावे लागेल त्याचा विचार केला

पाहिजे. व्यक्तीनी आपापल्यापरीने तिचे पालन कसे करावे त्याचाहि विचार करू

## १३ जमिनीची वहिवाट

या योजनेचा प्रथम परिणाम सध्याच्या जमीनवहिवाटीवर होईल हें उघडच आहे गावची जमीन गावच्या साऱ्या माणसांसाठी आहे म्हणून जो जो शेती करू इच्छितो त्या प्रत्येकाला इतराच्या बरोबरीने जमिनीचा हिस्सा मिळावयास पाहिजे. असे केल्याने सध्या जे मालकीनें किंवा कुळ-वहिवाटीने पण आपल्या रास्त हिस्साहून अधिक जमीन भोगीत आहेत त्यांची काहीशी अडचण होईल तसेच जे आजवर केवळ सागरूम्ये शेत-मजूर म्हणून मजुरी घेत आले त्यानासुद्धा आता स्वतःच्या जबाबदारीने व सयोजनाने सारा व्यवहार करावा लागेल व पीकपाणी हाती येईतो कित्येक महिने वाट पाहावी लागेल त्याचीहि दुसऱ्याप्रकारे अडचण होईल या अडचणीचे सर्वांनीच आस्थेवाईकपणें निवारण करावयाचे आहे. एकाची अडचण ती सर्वांची अडचण समजली जावी. भूमिहीनाना भूमी-बरोबरच शेतीची साधने व तात्पुरती पोटगी शक्य तो मोफत, नाहून (बिनव्याजी) कर्ज म्हणून, पुरविण्याची व्यवस्था गावाने करावी तसेच त्याना शेतीचे शिक्षण किंवा मार्गदर्शन देण्यात यावे जमानदारानाहि गावाने काही काळपर्यंत निश्चित उत्पन्नाची हमी द्यावी. त्यांनी सोडलेल्या विकसित जमिनीचा त्याना, ते मागणी करतील तर, काही वर्षेपर्यंत उतरता खड मिळावा किंवा त्या खडाच्या मोबदल्यात एकवट किंमतहि मिळावी. त्यानी तो खड किंवा ती किंमत दानार्थ सोडली तरीहि त्याना लाभणाऱ्या ग्रामस्थाचा सद्भावामुळें त्याना तो सौदा नुकसानीचा होणार नाहीं. तथापि ते त्याच्या मर्जीवर सोडण्यात यावे पाच पाच किंवा दहा दहा वर्षांनीं सर्व जमिनींचे फेरवाटप व्हावे, कारण तेवढ्या मुदतीत कुटुंबाकुटुंबाच्या जमीनविषयक गरजात फेरफार होतील बाहेरगावची काही कुटुंबें आलीं तर त्यानासुद्धा जमिनी मिळावयास पाहिजेत ज्याप्रमाणे आगगाडीच्या प्रवासात स्टेशना स्टेशनावर नवीन उतारू डब्यात शिरतात त्याना आतील

प्रवाशानी मज्जाव करावयाचा नसतो, तथापि बाहेरील उताराहि आतील भरणा पाहूनच या डब्याऐवजी त्या डब्यात शिरतात व परिणामी सर्व डब्यात साधारणपणे सारखीच गर्दी होते, तसेच गावोगावच्या शेतीचेहि होईल. कोणालाहि मज्जाव रहाणार नाही, त्यामुळें कोणी नाहक गर्दीहि करणार नाहीत.

गावातील जे धंदे शेतीच्या मोसमातहि बंद ठेवता येत नाहीत – उदा० सुतार, लोहार, न्हावी, धोबी, चाभार इत्यादीने – त्या धंदेवाल्यानी शेती न केली तरी त्याना शेतकऱ्याकडून त्याच्या कामाबद्दल योग्य मोबदला मिळावा की जेणें करून त्याचे जीवनमानहि शेतकऱ्याच्या बरोबरीचे राहील श्रेष्ठ – कनिष्ठपणाची भावना व वागणूक सर्वांनीच सोडून द्यावी व परस्पर – बंधुत्वाचे नाते जोडावे.

## १४ कारखाने

कारखान्यात प्रत्यक्ष काम – बुद्धीचे असो किंवा अंगमेहनतीचे असो – करणारे मॅनेजर, एन्जिनीयर, मुकादम, मजूर, विक्रेते इत्यादि, हेच कारखान्याचे चालक होतील. कारखान्याची जबाबदारी त्याना सभाळावी लागेल व कारखान्याचे उत्पन्नहि त्यानाच मिळेल. त्यानी ते आपापसात कसे वाटून घ्यायचे तो त्याचा आपापसातील प्रश्न राहील कारखान्याचे सचालन शक्य तर सहकारी पद्धतीने चालेल, नाहीपेक्षा मालकी पद्धतीने म्हणजे कांही जबाबदार चालक व बाकीचे पगारदार नोकर असा फरकहि राहील. पण उभयपक्षीं मालकी कारखान्याचे बाहेर जाणार नाहीं. कारखान्यासाठी ज्याने भाडवल पुरविले त्याचे तें ( बिनव्याजी ) भाडवल परत फेडण्याची जबाबदारी कारखान्याची, अर्थात् चालकांची, राहील. मुद्दल फेडीपलीकडे व्याज, भाडें, डिव्हिडड इत्यादि मिळावयाचे नाही पण त्यामुळें भाडवलदाराची एकाएकी अडचण होणार नाही. कारण त्याचे मुद्दल त्याला परत मिळावयाचेच आहे.

## १५ कर्ज – व्यवहार

योग्य कारणासाठी कर्जाऊ रकमा द्याव्या घ्याव्या लागतील, किंवा धान्यहि कर्जाऊ द्यावे घ्यावे लागेल. या कर्जांवर व्याज चढणार नाहीं. मुद्दलफेडीसाठी तारण पिकाचे, घराचे, अवजाराचे इत्यादि देता येईल, तसेच जमिनीत केलेल्या सुधारणाचे म्हणजे त्या सुधारणामुळें मिळणाऱ्या मुदतबदी व उतरत्या खडाचेहि देना घेता येईल.

ही आमची सूचना प्रचलित भूदानविषयक विचाराहून भिन्न आहे. सुधारलेल्या जमिनीची तात्पुरती मालकी हाच मूळी भिन्न विचार आहे. परतु ग्रामदानी गावाची व्यवस्था व कारभार ही अद्याप अनिश्चित स्थितीत आहेत; त्याना निश्चित रूप देताना ही तात्पुरती मालकी मान्य करावी लागेल, तसे केल्याखेरीज कारभारामध्यें सुरळीतपणा येणार नाही, असे आम्हाला वाटते. असो.

## १६ व्यक्तीचीं कर्तव्यें

आमच्या योजनेला सरकारची किंवा समुदायाची समति मिळण्यास काहीं काळ जाणे अपरिहार्य आहे तसे घडावे यासाठी आपल्याला खूप विचारप्रचार करावयास पाहिजे. चालू पद्धतीतील पिळणूक किंवा अन्याय ज्याच्या लक्ष्यात येईल ते ते या प्रचारकार्यामध्यें सहभागी होतील. त्यानी आपापल्यापरीने त्या विचारानुसार आचरण केल्याने त्याचा विचार प्रचार विशेष प्रभावी होईल. प्रचाराची दृष्टि बाजूला ठेविली तरीहि आत्मशुद्धि व आत्मसमाधान यांसाठींहि ज्याना विचार पटला त्यानी तद-नुसार आचरण करावयास पाहिजे, मग समाज व सरकार मानो वा न मानो. वर विचार साधिक आचरणाचा झाला. एकेकट्या व्यक्तीने काय करावे ? उदाहरणादाखल काही बाबी येथें नमूद करतो:–

१) व्यक्तीनें त्याच्या वहिवाटीखाली अधिक जमीन असल्यास आपल्या अदाजी रास्त हिस्साची जमीन ठेवून बाकीची गावाच्या साक्षि-त्वाने व समतीने लायक भूमिहीनाना वाटून द्यावी. हा अदाज ठरविणें

मुष्किलीचे वाटल्यास आपल्या जमिनीचा ¼ हिस्सा दान द्यावा व बाकीची जमीन यथाप्रमाण वाटून घेण्याची स्वत ची तयारी जाहीर करावी,

२) बहिवाट, म्हणजे कसवट, नसताहि मालकी हक्काने भोगणारी जमीन असेल तर ती वहिवाटदार कुळानाच अर्जी सोडून द्यावी, मात्र स्वत च्या कसवटीसाठी त्यातील काही घेणें आवश्यक असल्यास रास्त प्रमाणापर्यंत घेण्यास हरकत नाही

३) त्याने व्याज देऊ नये, घेऊहि नये मात्र यापूर्वीच त्यान कर्ज घेतलेले असल्यास त्या कर्जासाठीं केलेला करार शक्य तेवढ्या जलदीन पुरा करून मोकळें व्हावे.

४) मुद्दलफेडीपलीकडे भाडें व डिव्हिडड स्वत वसूल करू नये, इतराना देणे अपरिहार्य असेल तरच द्यावे

५) वर्षअखेर स्वत पाशी ( बँकेकडील व इतर येणी देणी धरून ) जी रोकड शिल्लक असेल तिचे ५% सत्पात्र गरजूना दान म्हणून द्यावे, इत्यादि

## १७ आशा – आकांक्षा

More sins are wrought for want of thought than for want of heart.

अर्थात् पापें दुष्टपणामुळें घडतात त्याहून अजाणतेपणामुळें अधिक घडतात, हे इंग्रजी वचन सत्य आहे मनुष्य हरप्रकारची दुष्कृत्यें करतो हे आपण पहातोच, पण तो स्वभावाचा दुष्ट नव्हे मग प्रत्यक्षात इतके गुन्हे कशाने घडतात ? याचे एक महत्वाचे कारण आपली समाजरचना मुळातच सदोष आहे, तिची पायाभरणीच ढिली आहे पाया कच्चा असला की वरच्या भिंतीहि खचतात व छप्परहि कोसळून पडते तसे समाजाच्या बाधणीचे झाले आहे " मनुष्य हा केवळ सुधारलेला म्हणजे कपडे घालणारा व चष्मे वापरणारा पशुच आहे, अर्थात् मोहि उभ्यानें चालणारा पशुच आहे," असा आत्महीनतेच्या भावनेनेच आपण वागत असतों या समजुतीतून

स्वार्थ, झोंबाझोंबी व मारामारी या खेरीज काय निष्पन्न होणार? पण मनुष्य पशुदेहाचा साधन म्हणून उपयोग करीत असला तरी मनुष्य म्हणजे पशु नव्हे हार्मोनियमची पेटी लाकडा—हाडाची बनलेली असली तरी तिचे मधुर मजुळ ध्वनि लाकडा—हाडाहून अगदीच भिन्न असतात. गणपति म्हणजे माती नव्हे तसाच मनुष्य हा पशु नव्हे. पशुजीवनाची कमान तिच्यामध्ये मानवतेचा प्रवेश होताच आपली दिशा बदलून चढतीची उतरती बनते मनुष्यजीवनाचे नियम पशुजीवनाच्या अगदी उलट आहेत. स्वार्थ हा पशुधर्म असला तरी मनुष्यधर्म परमार्थच आहे. देणे, स्वात्मार्पण हेच मनुष्यजन्माचे साफल्य आहे मनुष्य—समाजाची बांधणी या मूलधर्मानुसार व्हायला पाहिजे कुटुबाची रचना तशीच हाते पति पत्नीला, पत्नी पतीला व दोघेंहि अपत्याना स्वात्मार्पण करतात समाजामध्येंसुद्धा व्यक्ति अशा तऱ्हेनेच एकमेकामध्यें ओतप्रोत असावयास पाहिजेत, तरच तो मानवसमाज, एरवी ती लांडग्याची झुडच ठरेल. यासाठी आपल्याला समाजरचनेचा पायाच सुधारला पाहिजे

पायाच चुकला की प्रथम काही जाणून, काही अजाणता, अन्याय घडतात त्याची प्रतिक्रिया म्हणून दुसरे अन्याय घडतात अशातून दुष्ट परपरा वाढत जाते व सारे वातावरणच गढूळ बनते गढूळ वातावरणामध्यें सज्जनहि मार्गभ्रष्ट होतात तसे सध्या झालेले आहे व मानववशामध्यें यादवी माजलेली आहे

समाजाची पायाभरणी सुधारण्याचे परिपूर्ण नव्हेत पण काही सोपे व घोपट उपाय आम्ही सुचविले आहेत आपण सर्वांनी तेवढे मान्य केले व तदनुसार जीवनरचना केली तर वातावरण निवळेल व देवाने ज्याना परस्पराच्या साह्यार्थ शेजारी म्हणून निर्मिले परतु आज जे परस्पराचे वैरी बनलेत ते परस्परातील वैरे विसरून शेजारधर्माने वागू लागतील

साऱ्याच मानवसमाजाला आज याची निकडीची गरज जाणवत आहे भारताने आजवर अनेकदा जगाचे अग्रेसरत्व केलेले आहे भौगोलिक रचना व ऐतिहासिक परपरा यामुळें भारतावर काही जबाबदाऱ्या येऊन

पडतात, त्यांमध्यें ही अहिंसाप्रधान समाजरचना करून दाखविण्याची जबाबदारी आहे भारताने अहिंसेच्या मार्गाने स्वराज्यसंपादन करून दुनियेला एक नवीन मार्ग दाखविला आता अंतर्गत समाजरचनाहि त्याच पद्धतीनें करून दाखविण्याची जबाबदारीहि भारतावर येऊन पडते. त्यात असे भारताचे स्वत.चे कल्याण आहे तसें साऱ्या जगाचेहि आहे.

विनोबाजींचे ग्रामदानाचे कार्य हें या दृष्टीनें जागतिक महत्त्वाचे आहे. परतु ग्रामदान व्यापक व सार्वत्रिक व्हायचे तर जें धोरण आपण गावसमाजाच्या रचनेला लावणार तेच कारखाने, कचेऱ्या, व्यापार व अन्य आर्थिक व्यवहारासहि लागू व्हावयास पाहिजे. त्या दृष्टीनें परिपूर्ण नसोत पण सोपे मार्ग सुचले ते सुज्ञापुढें माडण्याचा येथवर प्रयत्न केला. सुज्ञानीं ते समत केले व अमलात आणले तर नवसमाज निर्माण होऊ शकेल.

आपण तशी प्रार्थना करू या, दृढ प्रयत्न करू या.

ॐ शांति। पुष्टिः तुष्टि. चास्तु।

# IV परिशिष्ट

या पुस्तकाचे हस्तलिखित वाचून मित्रांनी व गुरुजनानी प्रदर्शित केलेल्या सूचना–शंका–आक्षेपांचा थोडक्यात विचार या परिशिष्टात करण्याचे योजिले आहे.

## १ हें घडेल कसें ?

काहींना सहाजिकपणेच वाटते कीं ही शोषणमुक्तीची योजना रास्त व तर्कशुद्ध आहे, पण तुम्ही कायद्याची तर मदत घेऊ इच्छीत नाही, मग तिची अमलबजावणी कशी होणार ? "जानामि धर्मं नचमे प्रवृत्तिः" हे तुम्हीच सांगतां.

आमचे म्हणणे, ज्यांचेमध्यें धर्मजागृति विशेष प्रमाणात आहे त्या पुरुषार्थी लोकांनी स्वत: एकेकट्यानेहि या सिद्धांताचे आपापल्या व्यवहारात आचरण सुरू करावे म्हणजे ते इतरांनाहि प्रेरक होईल. मणभर तात्त्विक चर्चेपेक्षा तोळाभर आचरण लोकप्रवृत्ति बनविण्याचे कामी अधिक परिणामकारक होते मांसाहाराच्या त्यागासारख्या सर्व नैतिक सुधारणा आजवर याच तऱ्हेने घडून आल्या व घडत आहेत.

## २ सर्वसंमत कायदा

शिवाय आम्हांला सर्वसंमत कायद्याचीहि मदत घेण्याव कांही हरकत वाटत नाही. भूस्वामित्व विसर्जन किंवा व्याजनिरसन या बाबीच राष्ट्रा–राष्ट्रांच्या निःशस्त्रीकरणाप्रमाणे, किंवा ग्रामदानाप्रमाणे, सर्वांनी केल्यास अगदीच सोप्या व फायदेशीर, पण एकट्याने करण्यास जड व घोटयाच्या अशा आहेत पण एकेकटा तयार न झाला तर सारे कसे तयार होणार ? म्हणूनच षष्ठांश जमीन भूमिदानात द्या, आपल्या प्राप्तीचा कांहीं हिस्सा संपत्तिदानात द्या, यांसारखे सोपे व चिन्हरूप कार्यक्रम योजण्यांत आले. तथापि केवळी पाळलेहि युनिलॅटरल ( विनशर्त ) ज्यांना

झेपत नाही अशानी जरी "मला या गोष्टी मान्य आहेत, मी त्याप्रमाणे आचरणहि करू इच्छितो तथापि मी एकट्याने तसे करण्यास धजत नाही. सर्वांबरोबर आनंदाने करीन त्यासाठी तसा कायदा व्हावा असे मी इच्छितो" असे म्हटले किंवा लिहून दिले तर ते आमच्या ठरावाला त्यानी मत दिल्याप्रमाणेच होणार आहे. सर्वोदयपात्र हें समतिदर्शक मानलेले आहे त्यापेक्षाही अधिक स्पष्ट समति होईल. अशी सर्वांची, किंवा बहुतेकांची मते आम्हाला मिळाली तर मग कायदा करण्यासहि हरकत नाही. सर्वसमत कायदा म्हणजे एक प्रकारचा सक्तेच आहे. त्यात सक्तीचा अश शून्यच नसला तरी नाममात्र आहे. आपला रोख मानवी व्यवहारात सक्ती व हिंसा याचा अमल शक्यतो – सर्वस्वी शक्य नाही – कमी करण्याचा असावा या दृष्टीने कोऱ्या (कृतिशून्य) मतालाहि महत्व आहे, कारण ते मत सध्या कृतिशून्यसे दिसले तरी कृतिपरायणच आहे आमचे हे लिखाण हा अशा तऱ्हेच्या लोकमतसग्रहाचाच प्रयत्न आहे. लोकमत बनेल तसतसा शिष्टाचार व कायदा क्रमाक्रमाने घडेल व घडावा; मग त्या कायद्याची अमलबजावणी होण्यास अडचण येणार नाही

## ३ ग्रामदानाचा टप्पा

शिवाय ग्रामदान हा या मार्गावरील भक्कम पण प्रमाणात सोपा असा टप्पा आहे. "सारा मानवसमाज आमचे नवसमाजरचनेचे सकेत कधी स्वीकारणार असेल तेव्हा स्वीकारो पण आम्ही आपापल्या गावापुरते तरी ते स्वीकारतो" "सारी मानवजात मांसाहार कधी सोडील ती सोडू द्या पण आमच्या जातीचा तरी लगेच ठराव होऊन जाऊ द्या" असे म्हणूनच ज्याप्रमाणे सबध जातीच्या जाती शाकाहारी बनल्या. त्याचप्रमाणे शोषणमुक्त नवसमाजाची स्थापनाहि गावागावा- पुरती सुलभतेने होऊ शकेल.

आमची ही योजना म्हणजे ग्रामदानाची किंवा ग्रामराज्याची राज्य- घटनाच आहे. राज्यघटनेमध्ये किमान बाबीच मांडायच्या असतात, इतर बाबी नागरिकांच्या परस्पर सद्भावनावर व स्वेच्छेवरच सोडून देणे

सोयीचे असते. तसेच येथें आम्ही समाजसघटनाचे किमान संकेत माडले आहेत. याखेरीज नागरिकामध्यें समाजार्पण वृद्धि जितकी वाढेल तेवढी पाहिजेच आहे पण "समपण झेपन नसले तरी अगोदर अपहरणाचें निरसन तरी घडू द्या" हा आपच्या या योजनेचा भावार्थ आहे.

## ४ "कोणी बचत करणारच नाहीं"

"तुम्ही व्याज घेऊ देत नाही, दिलेत तरी नाणेघटीतून सूट या स्वरूपातच देणार म्हणजे खरेखुरे व्याज नाहीच, त्या अर्थी कोणी बचतच करणार नाही व त्यामुळें अपरिहार्य तेवढीहि भाडवलवृद्धि होणार नाही." असा आक्षेप घेण्यात येतो, पण तो आम्हाला सयुक्तिक वाटत नाही.

मनुष्य पोटासाठी श्रम करतो. दारूसाठी तो विशेषच झटून श्रम करतो हेहि खरे आहे. पण दारूच्या लोभाने त्यानें घटकाभर शिरा ताणून काम केले तरी मागाहून दीर्घकाळ तो निचेष्ट पडून रहातो; म्हणजे एकूण काम कमीच होते.

त्याचप्रमाणे मनुष्य बचत करतो ती मुळात दीर्घ दृष्टीने भावी उपभोगासाठी व आपत्प्रसगासाठीच करतो, व्याजासाठी नव्हे. मुळात व्याजाची लालूच दाखविल्यास तो अधिकच उद्योग व काटकसर करुन अधिक बचत करीलहे खरे पण त्या बचतीमुळें जर पुढें नित्य त्याला व्याजाच्या रूपानें विनाश्रम प्राप्ति होत रहाणार असेल तर पुढे तो कायमचा निकामीच बनून राहील. यात आपले, म्हणजे समाजाचें, एकूण नुकसानच आहे. उपायातून अपाय उद्‌भवणार नाही याची जबाबदारी घ्यावयास पाहिजे. म्हणून बचतीसाठी व्याजाची लालूच दाखविणें हानिकारक आहे. मात्र नाणेघटीपूर्वक मर्यादित व्याजाला सवलत ठेवल्याने व्याजाचे दुष्परिणाम बऱ्याच अशानें टाळतां येतील व स्वतःजवळील बचत इतराच्या उपयोगासाठीं उसनवार देण्यास प्रोत्साहनहि मिळेल.

